रा. रा. लक्ष्मण नार



संगीत

# दामाजी नाटक.

किंमत आठ आणे.

# संगीत दामाजी.



लेखक,

**लक्ष्मण नारायण जोशी**

श्रीसमर्थ रामदास,
डाकिनीविलास,
महादजी शिंदे,
कपिध्वज,
ही सारी भाऊबंदकी,
वगैरे पुस्तकांचा कर्ता.

इ. सन १९०४.

---

वामन गणेश आणि मंडळी,
बुधवारपेठ–पुणेंसिटी.

**किंमत आठ आणे.**

# शेट तुकाराम जावजी चौधरी, जे. पी.



## समर्पण.

श्लोक.

पित्यासारखे शांत दाते उदार ।
तुकारामजी जावजी थोर फार ॥
तुम्हां र्अापतों पुष्प हें पूज्यबुद्धी ।
सदा देव देवो तुम्हां ऋद्धिसिद्धी ॥

ल. ना. जोशी.

# आभारपुष्पभृंगार.



धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चारी पुरुषार्थांच्या सिध्यर्थ अक्षय झटण्यानें ज्यांनीं आपलें चौधरी हें उपनाम सार्थ केलें आहे ते निर्णयसागर छापखान्याचे मालक श्रीविठ्ठलभक्त **शेट तुकाराम जावजी** जे. पी., ह्यांनीं हें पांडुरंगाच्या नामसंकीर्तनानें पवित्र झालेलें माझें पंचरंगी अबीर आणि तुलसीपुष्पांचें तबक मजकडून भक्तीनें स्वीकारून, मजबद्दल आणि श्रीपांडुरंगाबद्दल जें प्रेम व्यक्त केलें त्याबद्दल मला त्यांचा उतराई करणें श्रीविठ्ठलाच्या हातीं आहे.

श्रीसरस्वतीमंदिर नामक जें निःपक्षपाति द्विमासिक पुस्तक मुंबईंत प्रसिद्ध होत असतें त्या पुस्तकाच्या चवथ्या वर्षाच्या पहिल्या अंकांत 'दुर्गादेवीचा दुष्काळ' ह्या मथळ्याखालीं जो मजकूर अस्सल कागदपत्रांच्या साह्यानें प्रसिद्ध झाला आहे त्या लेखाची—मला— हें पुस्तक लिहिण्याला जी मदत झाली त्याबद्दल मी श्रीसरस्वतीमंदिराचे व इतर इतिहासकारांचे जर आभार मानले नाहींत तर कृतघ्नतेचा दोष माझ्याकडे येईल.

आतां शेवटीं—हें पुस्तक जन्माला कसें आलें तें वाचकांस सांगून हा ल्हानसा आभारभाराचा लेख पुरा करतों.

इ. स. १९०३ च्या जुलै महिन्यांत—राजापूरकर संगीत मंडळीचे मालक रा. रा. बाबाजी दौलतराव राणे हे पुणें मुक्कामीं आले होते. तेथें माझ्या श्रीसमर्थ रामदास नाटकाच्या दुसऱ्या प्रयोगाच्या दिवशीं त्यांची आणि माझी गांठ पडली होती. त्यावेळीं त्यांनीं मला 'दामाजी'च्या चरित्रावर एक पंचांकी नाटक लिहावयास सांगितलें. मीं तें कबूल केलें. रा. रा. बा. दौ. राणे ह्यांची—श्रीविठ्ठलभक्त दामाजीपंतांच्या ठिकाणीं जी

पूर्ण श्रद्धा होती तिच्यायोगानें हें दामाजीपंतांचें नाटक आज अशा स्वरूपानें श्रद्धावान् आणि आस्तिक जनांच्या हातीं श्रीविठ्ठलाच्या कृपेनें माझ्या हातून पडत आहे. अशा तऱ्हेचें मजकडून तयार करवलेलें हें एका थोर, उदार, स्वदेशभक्त आणि स्वधर्मनिष्ठ संताचें चरित्र रा. राणे यांनीं जगापुढें प्रयोगरूपानें मांडून जी अल्पशी मराठी वाङ्मयाची सेवा मजकडून करवली तिच्याबद्दल सर्वांनीं त्यांचे आभार मानावे अशी माझी उत्कट इच्छा आहे.

मुंबई,
तारीख १ सपटेंबर
सन १९०४ इ.

सर्वांचा नम्र आणि कृपाभिलाषी,

**लक्ष्मण नारायण जोशी.**

---

## नाटकांतील पात्रें.

**सूत्रधार**—नाटकाचार्य.
**दामाजी**—मंगळवेढ्याचा ठाणेदार.
**मुजूमदार**—मंगळवेढ्याचा खजीनदार.
**बजरबट्टू**—ईशावतरण.
**हुमायुनशहा ब्राह्मणी**—वेदरचा बादशाहा.

**नटी**—नाटकाचार्यांची स्त्री.
**सावित्रीबाई**-दामाजीपंतांची स्त्री.
**पार्वतीबाई**—मुजूमदारांची स्त्री.
**आवडा**—मुजूमदारांचें अंगवस्त्र.

पाटील, कुळकर्णी, शिपाई, पंढरपूरकर एक ब्राह्मण, दुष्काळग्रस्त-लोक, वजीर, काजी, खुषमस्कऱ्या, भालदार, वारांगना, मुसलमान शिपाई, रंगराव, वगैरे इतर किरकोळ पात्रें.



संगीत

# दामाजी नाटक.

## अंक पहिला.

### नान्दी.

( यमन-चौताल. )

त्रैकाल्य ध्यानिं धरिति ॥ ब्रह्मा शिव विष्णु व्यास ॥
जें पद बहु सुखकारक ॥ तेंच गणेश सुकविंसह ॥
हृदयिं स्मरुनि नमि हा कवि ॥ ध्रु० ॥ आदिशक्ति तारांगणिं ॥
धरीं तीच सकलगामि ॥ करी खेळ तिस सुमनें ॥
अर्पण करितो हा नविं ॥ ध्रु० ॥

( फुलें व गुलाल रंगदेवतेला वाहिल्यावर )

वा[illegible]

( बहार-त्रिताल. )

परजि[illegible]त आद्यतनया प्रसन्न स्थलिं या होवुनी येवो ॥ ध्रु० ॥
सूत्रध[illegible]र मम वाणी करुनी ॥ प्रकृत काव्यीं रंगा भरवो ॥
नटी [illegible] [illegible]वींचा ॥ वाही मी तो रंगा उडवो ॥ १ ॥
[illegible] ॥ अनिष्ट सर्वहि दूरचि जावो ॥
[illegible]ी ॥ वाक्दा मनिंची इच्छा पुरवो २

[illegible]जनहो, देवतादि कविवर्यांचा [illegible] आपणांसारख्या थोरांच्या कृपेची इच्छा आहे, ती पूर्ण व्हावी. आज मी आपल्याला–

### साकी.

करुणरसाश्रित भक्तिरसानें पूर्ण सदन भरलेलें ॥
दावायातें रंगकलेचे घेउनि नट सजलेले ॥
भरुनी सूत्रातें ॥ आलों, आश्रय द्या ह्यातें ॥ १ ॥

अशा प्रसंगीं मला नेहमीं साह्य करणारी ही माझी प्रिया पहा इकडेच येते आहे. खरोखर--

( हमीर-त्रिताल )

सखि ही कैसी ह्या समयीं ॥ आली झाली लाभमयी ॥ध्रु०॥
सखि गजगामिनि ॥ जितसौदामिनि ॥ सुहृदस्वामिनि ॥
कामिनि ही ॥ ध्रु० ॥

( नटी गात येते )

नटी--

( जिल्हा-दादरा. )

मम पति मज पाहि रघुपति सीतेस तैसा ॥ ध्रु० ॥
सुखद जिष्णु कृष्णेसी ॥ तत्सम मम पति मजसी ॥
किति काय वदुं मज पति ॥ जगीं देव जैसा ॥ ध्रु० ॥
विमल विष्णु भक्तीसी ॥ सेवुनि गळिं धरुं तुळसी ॥
भवताप हरी समुळ ती ॥ तमा सूर्य कैसा ॥ ध्रु० ॥

सूत्रधार-प्रिये, ठरल्याप्रमाणें अगदीं ऐन प्रसंगीं आ[...] फार उत्तम झालं.

नटी-आतां काय आज्ञा आहे ?

[...]ची स्त्री.

सूत्रधार-ह्या प्रेक्षकांनां मी काय सांगतों तें ऐक. सु[...]

दिंडी.

वंश जगतीं शांडिल्यगोत्रिं ज्याचा ॥
असा कवि जो सौमित्र तत्कृतीचा ॥
दाखवीतों मासला शोधना त्या ॥
करुनि सुखवा दूषवा सुधीरील्या ॥ १ ॥

नटी--आलं लक्षांत. ज्या दामाजीपंतांकरतां प्रत्यक्ष पांडुरंगानं महाराच्या वेषानं बेदरच्या हुमायुनशहा बादशहाकडे रसद भरली-त्या प्रसंगाचं नाटक आज आपण करून दाखवणार

आहांत; पण ह्या नव्या कवीचा हा नवा प्रयत्न लोकमान्य होईलका?

सूत्रधार–प्रिये, आपण मेहनत घेऊन तयार केलेली वस्तु बाजारांतच जर मांडली नाहीं, तर तिची खरी किंमत कशी होणार! असो. त्या वेळच्या त्या भयंकर दुष्काळाचं वर्णन–ह्या प्रेक्षकांनां थोडक्यांत ऐकवतेसका?

नटी–अगबाई–केवढा तो भयंकर दुष्काळ!

( यह बदीमे पाया गम्० )

यमराज नसे हो काळ ॥ असे दुष्काळ ॥ अति माळ पहा भूभाळ ॥ पाउसा नच आला मुळिं ताळ ॥ नच साळ डाळ मुखिं लाळ ॥ उठे हृदिं जाळ ॥ बहु राळ करी, वदुं काळ रडवि हा जळिं खिळोनि बळांत ॥ सति जती यती किति बाळें ॥ गांजि हा आपुल्या चाळें ॥ त्यामुळें सजिव तनु वाळे ॥ इंधनें जाहल्या अस्थी ॥ फुटे बस्ती ॥ जगिं दिसते परजित वस्ती ॥ ह्यामुळें हा दुष्काळ अभंग ॥ १ ॥

सूत्रधार–अगदीं खरं. पण हें ऐकलंस का?

नटी–खरंच–कुठें बरं हें भजन चाललं आहे?

सूत्रधार–प्रिये, ऐक–

साकी.

श्रीहरिचरणीं लीन सदा जो दाता मान्य खलांला ॥
दामाजी तो हरिभजनानें पावे सत्कीर्तीला ॥
हरिपादिं झिजवूंया ॥ त्यासम अपुल्या ह्या काया ॥ १ ॥

( सूत्रधार व नटी जातात. ही प्रस्तावना झाली. )



## प्रवेश पाहिला.

[ घरांत–दामाजी भजन करीत बसला आहे. ]

दामाजी–

( हमीर–त्रिताल. )

चिंतुनि मानसिं श्रीहरिला ॥ वदनीं गाऊं हरिलीला ॥
करिं हरिच्या करूं पूजेला ॥ हरिलीलामृतपान कराया
नटवूं श्रोत्रांला ॥ ध्रु० ॥ लोचनिं निरखुनि श्रीहरिला ॥
मस्तक हरिपदिं ठेवियला ॥ हरिपदिं जिव हा बहु रमला ॥
हरिपदतुलसीदलसौंगंधें तोषित हा झाला ॥ ध्रु० ॥

अहाहा–काय ह्या हरिरूप विठ्ठलनामाचा महिमा आहे ! ज्यांनां ह्या नामाची गोडी कळत नाहीं ते केवड्यांतल्या निर्गंध कणसाप्रमाणेंच होत. सदासर्वदा––

अभंग.

पांडुरंग वाचे ॥ वदा तुम्ही साचे ॥ आहे तें फुकाचें ॥
सोडूं नका ॥ १ ॥ कैवल्यदाता तो ॥ पांडुरंग एक ॥
आणिक माईक ॥ टाका त्यासी ॥ २ ॥

पांडुरंगा–ह्या यवनांची गुलामगिरी पुरे झाली आतां. तुझ्याजवळ पंढरपुरास येऊन एकसारखं तुझं तें गोड नांव घेत बसावंसं वाटतं. ( पाहून. ) पण हें कोण बरं इकडे येताहे ?

( एक ब्राह्मण येतो. )

ब्राह्मण–अहो, ह्या गांवांत त्या थोर दामाजीपंतांचं घर कुठें आहे तें सांगाल का ?

दामाजी–त्यांच्याशीं आपलं काय काम आहे ?

ब्राह्मण–ते गरिबांना अन्न घालून त्यांचा प्रतिपाळ करतात असा त्यांचा लौकिक आहे. म्हणून मी इथें आलों आहें.

दामाजी–खरंच भटजीमहाराज, पांडुरंगाच्या कृपेनं त्यांच्या

घरीं नेहमीं रखुमाबाई गरिबांचं पोषण करते. आपण कुठून आलांत ?

**ब्राह्मण**–मी पंढरपुरीं असतों. आज तीन दिवस झाले, उपाशी आहें.

**दामाजी**–हेंच त्यांचं घर.

**ब्राह्मण**–माझी बायको, मुलं आणि गुरं उपासानं तड-फडून प्राण देण्याच्या पंथांत आलीं आहेत. त्यांच्याकरतां मी इथें आलों आहें. ( **सावित्रीबाई** एकदम बाहेर येते. )

**सावित्री**–भटजीमहाराज, काळजी करण्याचं कांहीं कारण नाहीं. देवाच्या दयेनं सगळं संकट दूर होईल. हें घर कनी–

( जाहले आभार भारी० )

**आपुलें आगार माना श्रीहरी ॥ भवफेऱ्यांच्या त्या लाटा तो हरी ॥ ध्रु० ॥ सर्व आम्हीं जगतिं त्याचे पाहुणे ॥ काळ कैसा छळिल आम्हां महिवरी ॥ १ ॥ पुत्रकांता यांस आणावें इथें ॥ तोषुनी सोडिल कीं तो श्रीहरी ॥ २ ॥ धर्म गेला म्हणुनि आला काळ हा ॥ ध्यानिं येई होय आर्यां सुख तरी ॥ ३ ॥**

**ब्राह्मण**–( पायां पडून. ) महाराज, ह्या आश्रितजनावर आपले हे मोठे उपकार आहेत.

**दामाजी**–माझे उपकार कशाचे ! ही सगळी विठ्ठलाची कृपा आहे. ज्यांच्या मुखांत निरंतर–विठ्ठलनाम येतं, ज्यांच्या कानीं निरंतर विठ्ठलभजन पडतं, ज्यांच्या मनीं निरंतर विठ्ठलचिंतन होतं, ते प्रत्यक्ष विठ्ठलच होत. त्यांचा महिमा किती तरी गावा ! त्यांची सेवा घडावी हाच मोक्ष होय. तशी सेवा आज आपल्या आगमनानं मला अनाथाला घडली आहे, हें माझं मोठं भाग्य आहे. महाराज, ब्राह्मणांची सेवा ह्या काळांत घडत नाहीं. ती फार दुष्प्राप्य झाली आहे ! ब्राह्मण्य राहिलं आहे कुठें ! पहा–

*( उद्धवा शांतवन० )

स्वधर्म टाकुनि यावनि धर्मीं जन गेले बहुता रीति ॥
भाषा आपुलि सोडुनि त्यांच्या भाषेतें बहु मानीती ॥ध्रु०॥
किति लोभें जेवूं जाती यवनगृहीं मानुनि प्रीति ॥ चाल ॥
होमा हवना दिधला फाटा ॥ स्वधर्म झाला सकलां कांटा ॥
जनप्रकोपा आल्या लाटा ॥ स्वहित तयां सोडुनि गेलें ॥ चाल ॥
धर्मबाह्य गोष्टी ऐशा ॥ खेदातें कारण होती ॥ ध्रु० ॥

परंतु बादशहाकडे ह्याची दाद कुठे आहे ? ते कशाला गरिबां-कडे पहातील ! पण कांहीं चिंता नाहीं. चला तुम्हीं सर्वजण घरांत.

**ब्राह्मण**–आम्हांला बादशहाच्या ठिकाणीं तुम्हीच आहांत. आमच्याचकरतां आपल्याला विठ्ठलानं उत्पन्न केलं आहे. माझीं मुलंबाळं इथें नाहींत. त्यांनां उपासमरीनं जागेवरून उठवत दिखील नाहीं. मग इथपर्यंत चालण्याची गोष्ट कशाला पाहिजे ! मी एकटाच इथें आलों आहें. तीं पंढरींत आहेत. तुम्हांकडून जें कांहीं मिळेल तें घेऊन त्यांनां नेऊन देईन.

* ह्या पद्याबद्दल पुढील पद्य रा. सा. वि. कों. ओक यांनीं केलें आहे. तें म्हटलें असतां चालेल.

( जवका अजव तडाका० )

हिंदूधर्म बुडालाहो यवनी धर्म गमे लाहो ॥ ध्रु० ॥
दारिद्र्यानें पीडित झाले जन जे अनेक रीती ॥
पैशाकरितां करूं नये तें सारें कर्म करीती ॥ १ ॥
पैशाकरितां धर्म टाकिती यास म्हणावें काय ॥
त्यांच्या नांवें जन्मभूमि ही रडे मोकलुनि धाय ॥ २ ॥
तरि त्यांमध्यें तुमच्यावाणी धर्मपरायण निघती ॥
त्यांतें पाहुनि संतोषुनिया स्थिर ते कांहीं बसती ॥ ३ ॥
तुम्हांसारख्या परीजनांतें होती पीडा जेव्हां ॥
पांडुरंग तो साह्य कराया करी योजना तेव्हां ॥ ४ ॥

**सावित्री**—अहो भटजी महाराज, 'जें कांहीं मिळेल तें' असं कां म्हणतां? आपल्या घरांत कांहीं कमी कां आहे? हवं तें नि हवं तितकं घेऊन चला.

**ब्राह्मण**—ह्या आश्रितावर हे आपले उपकारच आहेत.

**दामाजी**—भटजीमहाराज, आमचा जन्म परलोकसाधण्याकरतांच झाला आहे. नानाप्रकारचे मोह उत्पन्न करणाऱ्या वस्तूंकरतां आपला जन्म आहे असं म्हणणारे प्राणी अज्ञ होत. हें पहा—

( मरण गणुनि दूषवी० )

**हृदयिं धरुनि द्रव्य तें प्रभूसमान पूजिती ॥ दुष्कृतिचरकीं भल्या जगा समूळ गाळिती ॥ धृ० ॥ अनय करी अंधमती त्याकरितां तत्प्रतीं ॥ सोडुनियां स्नेह सदा दूर जाइ तें अती ॥ १ ॥ ईशभजनिं द्रव्य त्यजुनि संत सतत लोळती ॥ म्हणुनिच त्यां विठ्ठलपद मिळुनि मिळति सुखतती ॥ २ ॥**

**ब्राह्मण**—मी येतों आतां.

**सावित्री**—हें पहा, आपल्याला पुन्हां येण्याचे श्रम कशाला? भाड्याचे बैल करा. हवं तितकं धान्य घेऊन चला. भाड्याचे दाम सुद्धां ह्या घरांत मिळतील. काळजी नका करूं! चला माझ्याबरोबर. (**सावित्रीबाईसह** ब्राह्मण जातो आणि शिपाई **बजर**-बट्टूला पकडून आणतात.)

**दामाजी**—अरे सोडा त्या विचित्र प्राण्याला! कायहो, तुम्हीं कोण? तुमचा हा विचित्र देह ह्या जगांत केव्हां उत्पन्न झाला? तुम्हीं कुठच्या देशचे?

**बजरबट्टू**—मी मनुष्य आहें. माझ्या आईला बरं वाटलं तेव्हां तिनं मला हें जग दाखवलं. हें जग हाच आमचा देश.

**दामाजी**—ह्या जगांत अती धांवणारी गोष्ट कोणची बरं?

**बजर०**—कल्पना.

**दामाजी**–कुटुंबांत भयंकर गोष्ट कोणची नसावी ?

**बजर०**–दुष्ट बायको आणि नोकराची चवळ जीभ.

**दामाजी**–ह्या दोन्ही गोष्टी कुठें बघायला सांपडतील का ?

**बजर०**–हो हो ! आमच्या एका मावसभावाच्या घरीं.

**दामाजी**–त्यांचं नांव काय ?

**बजर०**–मुजूमदार ! आपल्याच हाताखालीं ते असतात.

**दामाजी**–ते मोठे भगवद्भक्त आहेत. त्यांची शंकराची उपासना फार दांडगी आहे.

**बजर०**–तितकीच दांडगी त्यांची बायको आहे. मी त्यांच्याच आश्रयाला राहण्याकरतां इथें आलों आहें. सध्यांच्या दुष्काळांत, आपल्या देशबांधवांची सेवा करण्याकरतां ह्या मंगळवेढ्यांत मी राहणार आहें.

**दामाजी**–कोणच्या तऱ्हेनं सेवा करण्याची दिशा तुम्हीं पतकरली आहे ?

**बजर०**–मला एक पैक्याचं झाड सांपडलं आहे. आपण ठाणेदार आहांत. आपल्याला जेव्हां अडचण पडेल तेव्हां मी तें आपल्याला देईन. आपण हवा तितका धर्म सुरू करा. गोरगरिबांचे आज प्राण वांचले तर उद्यां राजाची किंमत. प्रजाच जिथें नाहीं तिथें राजेपणा कुठला !

**दामाजी**–तुमचं नांव काय ?

**बजर०**–बजरबट्टू.

**दामाजी**–( स्वगत ) बरं, हा पांडुरंगच जगाच्या कल्याणाकरतां ह्या रूपानं अवतरला नसेल कशावरून ? ( उघड ) तुमचं नांव कसंका असेना ! मला तुम्हीं पांडुरंगरूपी दिसताहांत !

**बजर०**–हें पहा–प्राणीमात्र ईश्वरी अंशावांचून नाहीं. मी प्राणी आहें. माझ्यांतही देवाचा अंश असलाच पाहिजे. हें जसं

खरं आहे तसंच करताकरवताही तोच आहे. सुकाळाचे काय किंवा दुष्काळाचे काय सर्व तऱ्हेचे दिवस त्याच्याच इच्छामात्रें-करून उगवतात. कांहीं असो. सध्यांचा काळ परोपकाराचा आहे. हाच काळ पुढें मोबदल्याचा होणार आहे.

**दामाजी**–आपलं असं परोपकाराचं व्रत असतां डोक्याला ही अशी पपनसाच्या सालीची टोपी कां?

**बजर०**–आमचं काय? सगळीच भिक्षा. (टोपी हातांत घेऊन) सूर्याची उष्णता बाधूं नये म्हणून आंतला गीर खाऊन हें गार शिरस्त्राण घातलं आहे. हें उताणं झालं कीं, भिक्षेची तयारी.

**दामाजी**–भिक्षेचा महिमा मोठा खराच.

**बजर०**–तरमग या शिपायांना आतां रजा द्यावी?

**दामाजी**–तुम्हांला ते मुळींच त्रास देणार नाहींत.

**बजर०**–बरं आहे तर येतों आतां. (शिपायांसह जातो.)

**दामाजी**–पहा, अलीकडे दुनियेंत किती तऱ्हेचे अत्याचार घडताहेत. कामांधांची तर कल्पनाच करवत नाहीं. पांडुरंगा,–

(अति कोपयुक्त०)

**वेदवाक्य तोंडिं सतत माळ करिं जपा ॥**
**भस्मलेप सकल अंगिं ॥ दांभिकजन ह्याच रंगिं ॥**
**दिसतो, परि काम ढोंगि ॥ राहि पोटिं, वन्हि**
**जणुं तपा ॥ ध्रु० ॥**

काय हा चमत्कार! हा काम भस्मरूपानं जगांत असतांही इतका खडतर असावाना? एवढ्याच करतां वैष्णवांनीं भस्माचा त्याग करून गोपीचंदनाचा स्वीकार केला असावा असं दिसतं. असो. घोर कृतींचा मोड अघोर कृतींनींच होतो, असा ह्या जगाचा नियम आहे. त्याप्रमाणें झालं म्हणजे पूर्वस्थिति आलीच पाहिजे. म्हणून–

साकी.

विठ्ठलचरणीं लक्ष ठेवुनी विठ्ठल विठ्ठल वाचें ॥
वदुनी, आश्रय पुण्यपथाचा करितां पापनगाचे ॥
होती कण साचे ॥ गणती करवे नच वाचें ॥ १ ॥

( जातो. )

## प्रवेश दुसरा.

( दिवाणखान्यांत **मुजूमदार** आणि त्याच्या पलीकडे **बजरबट्टू** बसला आहे. )

**मुजूमदार**–अशा माझ्या ऐश्वर्याच्या काळांत तूं माझ्या घरीं राह्यला आलास हें फार चांगलं झालं. तुझ्या बुद्धीचा उपयोग मला चांगला होणार आहे. पण कायरे, हें जग किती पक्ष मिळून झालेलं आहे हें तुला माहीत आहे का ?

**बजर०**–ह्या जगाला पक्ष्यांसारखे दोन पंख आहेत. पण ते मांजरानं गळा पकडलेल्या पारव्याप्रमाणें आपसांत एकसारखे फडफडताहेत.

**मुजूमदार**–ह्याचं कारण काय ?

**बजर०**–एक भुकेबंगाल आणि दुसरा श्रीमंत म्हणून. पण दोहोंत तफावत म्हटली तर कांहींच नाहीं.

**मुजूमदार**–तें कसं ?

**बजर०**–हल्लींचे श्रीमंत पूर्वी कधींतरी भिकारी होते. त्याचप्रमाणें पूर्वींचे श्रीमंत सध्यां भिकारी आहेत. एकून एकच.

**मजूमदार**–हें जर तुझं म्हणणं खरं आहे तर मला असं सांग कीं, पूर्वींचे श्रीमंत किंवा हल्लींचे श्रीमंत सध्यां एकमेकांच्या उलट स्थितींत कां बरं आहेत ?

**बजर०**–हें चालायचंच. सूर्याला जर तीस घटकांत तीन अवस्था प्राप्त होतात तर श्रीमंती आणि गरिबी ह्यांची काय बिशाद. अचाट कर्मं करावीं श्रीमंत व्हावं. अचाट कर्मं करावीं दरिद्री व्हावं. दोहोंचं कारण एकच.

**मुजूमदार**–अचाट कर्मं करून जे नवे श्रीमंत होत असतात त्यांच्याकडे पाहून श्रीमंत झालेले नाकं मुरडतात. हीच स्थिति त्यांचीही कधीं तरी होती असं म्हणायला काय हरकत आहे ?

**बजर०**–मुळींच नाहीं.

**मुजूमदार**–असं जर आहे तर मग आपणही श्रीमंत होण्याचा मार्ग धरला तर काय हरकत आहे ?

**बजर०**–म्हणतो कोण ? खुशाल धरावा !

**मुजूमदार**–ह्या कामांत तुझा सल्ला आहे हें ठीक आहे. आजपासून तूंच माझा मुनीम. मात्र विश्वास. गिऱ्हाईक सोडा-यचं नाहीं. हरतऱ्हेनं पटवून घ्यायचं. आजपर्यंत हें काम आवडाजी नायकिणीकडे होतं. तिनं मला सर्वस्वी ठकवलं. पण उपाय काय ?

**बजर०**–आहे–ह्याला उपाय आहे. जी मुलगी जन्माला येऊन इथली हवा खाऊं लागल्याबरोबर आपल्या आईलाच मटकावूं लागते अशी एखादी मुलगी तुम्हाला माहीत आहेका ?

**मुजूमदार**–अशी मुलगी कोण बुवा असणार ?

**बजर०**–अहो मेणबत्तीची वात.

**मुजूमदार**–वाहव्वा ! बरं मग तिचं काय ?

**बजर०**–तोच न्याय आवडाजीशीं लढवावा म्हणजे झालं. मी तें सगळं करीन. पण हा तंटा कसला चालला आहे तिकडे ?

**मुजूमदार**–अरे हीच ती आवडाजी. तिचा आणि आमच्या कुटुंबाचा तंटा चालला आहे. दोघी एकसारख्याच द्राष्ट आहेत. पण ही आतां इथें कशाला आली मरायला ? अरे हें भांडण इकडेसच आलं. (आवडाजी आणि **पार्वती** दोघी भांडखोर मुद्रेनें येतात.)

( रामकरीं जरि नृपपद० )

पार्वती–देगे मज तूं दागीने ते ॥ फसवुनि माझ्या
हे तूं पतितें ॥ नेले असशीं तुज मी वदतें ॥
कपटखनी अससी ॥ १ ॥

आवडा–कपटखनी मी विश्वयोषिता ॥ समजसि तरि
कां अपुल्या नाथा ॥ मम सदनीच्या खाण्या
लाथा ॥ येण्या कां देसी ॥ २ ॥

पार्वती–जादूटोणा करुनी पतिला ॥ भुरळ पाडिली
तूं तन्मतिला ॥ संसारावारि घालुनि घाला ॥
बुडविसि तूं मजसी ॥ ३ ॥

आवडा–लुब्ध तुझा पति मजवर झाला ॥ चालुनि आला
मम सदनाला ॥ दोष देइ हा प्रालब्धाला ॥
वदतें मी तुजसी ॥ ४ ॥

पार्वती–पुरे करी ती वटवट आतां ॥ मारिन नाहीं तर
मी लाथा ॥ गृहस्वामिनी मी मम सत्ता ॥
तोंड किती करशी ॥ ५ ॥

आवडा–कांहीं केलें तरि मी तुजला ॥ देईं नच गे
दागीन्यांला ॥ श्रम पडले हे मेळविण्याला ॥
किति तरि ते मजसी ॥ ६ ॥

पार्वती–हं खबरदार! मला हें अगदीं खपायचं नाहीं.

मुजूमदार–मलाही हा असला प्रकार खपायचा नाहीं.

आवडा–आम्ही वेश्या बऱ्या. ह्या लग्नाच्या बायका–माझ्या सारखीशीं झोंबी खेळतात.

पार्वती–सांभाच्या बोडक्यावर रोज पाटीभर बेल वाहता अन् हिकडे हें असं बदफैलीपणाचं वर्तन करतां. याची कांहीं शरम !

मुजूमदार–माझा राग मोठा विलक्षण आहे ! संभाळून ऐस.

**पार्वती**–एकून आपल्याला राग आहे म्हणायचा? पाहूं तर खरा कसा आहे तो?

**मुजूमदार**–हं तोंड आटप. एक घाव न् दोन तुकडे करीन.

**बजर०**–नका हो नका? सैंपाक करायला घरधनीण नाहींशी होईल.

**पार्वती**–दम धर मेल्या. तुझीही चांगलीच कणीक मऊ करतें.

**बजर०**–आपल्या सारख्या सर्पिणीपुढें मी बेडकासारखा नम्र आहें.

**पार्वती**–कायग, काढ ते अंगावरचे सारे दागिने. आत्तां उतरून ठेव नि मग हवीतिकडे जा.

**मुजूमदार**–अग, जरा माझं ऐक. आपल्याला जो आज मुबलक पैका मिळतो आहे तो हिच्याच मध्यस्तीनं ना? मग असं काय बरं करावं?

**पार्वती**–पैका मिळतो–पैका मिळतो–म्हणून तोंडानं म्हणतां; पण माझ्या अंगावर एका तरी दागिन्याला ठिकाण आहे का?

**मुजूमदार**–इतकंचना? आवडा, दे तिला हवे ते दागिने. आपल्याला कांहीं कमी नाहीं. पुन्हां नवे करूं.

**पार्वती**–ते तिनं वापरलेले दागिने मी घालूं म्हणतां होय? कध्धीं कध्धीं घालायची नाहीं. ते सारे आटवा. नवे करा. मग मी घालीन.

**बजर०**–मोत्यांचं कसं काय? तीं आटल्यावर त्यांचा चुना होणार. पुढें?

**पार्वती**–एकदां तुला सांगितलं. मधें बोलायचं काम नाहीं.

**मुजूमदार**–ठीक आहे. दागिने किती दिवसांच्या आंत पाहिजेत?

**पार्वती**–तेरवांच्या दिवशीं आहे महालक्ष्मी. त्या दिवशीं पाहिजेत.

**मुजूमदार**–कबूल. जा आतां घरांत.

**पार्वती**–कां बरं ? मी लग्नाची बायको इथून जाऊं ? अन् ही कोण ? ही इथे कशाला ?

**मुजूमदार**–अग तिनं कुळं आणलीं आहेत. त्यांच्या संबंधानं बोलायचं आहे. जा तूं आतां. किती तरी रात्र झाली ?

**बजर०**–हो-पुन्हां पहाटे केरपोतेऱ्याला उठलं पाहिजे लवकर.

**पार्वती**–मेल्या, काय म्हणतोसरे ? (तो पळतो) हात् तुझं कपाळ फुटलं. (जाते.)

**बजर०**–मला एक युक्ति सुचली आहे सांगू का ? आतां आपण नवे दागिने तेरवांच्या करतां करणार आहांत ना ?

**मुजूमदार**–अरे वेड लागलंय तुला ! सारे दागिने कुठें दोन चार दिवसांत होतात कीं काय ? आवडाच्याच दागिन्यांना उजळा देईन म्हणजे झाले कोरे.

**आवडा**–तें मात्र बोलूं नका. एक फुटकी कपर्दिकसुद्धां मी आपल्या दागिन्यांतली देणार नाहीं. एकदां त्या बयाच्या हातांत गेले कीं आम्हीं बसलों—

**बजर०**– अग, आतां नवी कुळं आणली आहेस त्यांच्यापसल्या पैशाचे आपल्याला नवे कर म्हणजे झालं.

**आवडा**–हो–तसं केलं तर चालेल.

**मुजूमदार**–द्या तर मग. आतांच उजळा द्यायला धाडतों.

**बजर०**–कशाला. उद्यां सकाळीं मी जाईन हिच्या घरीं अन् घेऊन येईन.

**मुजूमदार**–तरी बरं. हं काय नवं प्रकरण आणलं आहे बोला ?

**आवडा**–( दरवाजापाशीं जाऊन कुळकर्ण्याला व एका कुणब्याला घेऊन येते. ) बसा इथें.

**मुजूमदार**–कसं काय, बादशहाकडून आलेल्या रकमेची योग्य व्यवस्था केलीतना?

**कुळकर्णी**–दामाजीपंत ठाणेदार फार चांगले गृहस्थ. ते खरे देवभक्त. कोणाही गरिबाला अथवा दुष्काळपीडिताला त्या पन्नास हजारांतून मुबलक अन्न देण्याची त्यांनीं मला ताकीद केली आहे.

**मुजूमदार**–ती तुम्हीं योग्य बजावीत असाल?

**कुळकर्णी**–तीच गोष्ट आपल्या कानांवर घालून ठेवण्याकरतां आलों आहें. आश्रय असावा.

**मुजूमदार**–तुम्हां कुळकर्ण्यांचा अन् पाटलांचा कावा कांहीं निराळाच असायचा.

**कुळकर्णी**–हा कुळंबट पहा.

**शेतकरी**–सरकार, आज दोन वर्सं माझ्या शेतांत कपाळा लावाया योकभी दाना आला न्हाय. दुस्काळात बैलं म्येली, पोरं गमावली अन् झोपाबि ग्येला. अस्तुरी गमावन्याच्या बेतांत हाये. वाइच पाउसपानी व्हउद्या. सरकारच्या द्येखत सम्दा निकाल करीन.

**मुजूमदार**–तुम्हां कुळंबटांची अशीच सदा रड. सुखानं कधीं देवघेव नाहींच. पट्टीचे पैसे तुम्हीं चट्कन् दिलेत असं व्हायचंच नाहीं.

**कुळकर्णी**–ह्या दुष्काळांत सगळेच सारखे. आहे तो ओरडतो नाहीं तोही ओरडतो. करावं काय? सरकारवसूल तर झालाच पाहिजे. नादारांना सरकारांतून सूट मिळाली आहे. हा दार आहे.

**मुजूमदार**—आतां सरकाराजवळ सूट द्यायला जागाच नाहीं. लवकर पट्टी दे. नाहींतर जमिनीचा लिलाव करूं.

**शेतकरी**—माझं सम्दं ग्येलं. न्हायला ङ्वाप्डबी राह्यलं न्हाय. ह्या कुळकर्ण्याच्या भावाकडं जमीनबी घाण पल्डीया. अन् मी दार हाये असं कसं म्हंगता ? खायाला दाना न्हाय म्हून बरबड्याच्या पाल्यावर दिवस काढतो हाये. योक डोबड हाये. ती व्होवीतर पट्टी म्हून घ्या. आपणाकडं राह्यली तर जीव तरी धरील.

**मुजूमदार**—आम्हीं फेरीवर निघणार आहोंत. आठ दिवसांनीं तुझ्या गांवीं येऊं. मग समक्ष निकाल करतां येईल. जा आतां. ( शेतकरी जातो. )

**कुळकर्णी**—मुजूमदारसाहेब, आपण चालवलेलं कृत्य फसणार तर नाहींना ? नाहीं तर तुमच्या पायीं आमचा वतनी हक्क जाऊन तुरुंग गाठावा लागायचा. काल दहा हजारांची भरती आपणांकडे केली ती त्या पन्नासांपैकींच.

**मुजूमदार**—अहो, ह्या मोंगलाईंत मुलाच्या मुंजीची रजा नातवाच्या लग्नाला मंजूर होऊन येते. इतकं हे अव्यवस्थित राज्य आहे. हें जर आपण ढळढळीत बघतों आहों, तर भिण्याचं कारण काय ? दुष्काळावरचा अधिकारी मी नसलों म्हणून काय झालं ? बादशहाचे अधिकारी कोण आहेत तें ह्या अशिक्षित प्रजेला काय माहीत ? स्वस्थ असा. आपण आज खाल्लेले पैसे आपल्या मागें आपल्या नातवांना सरकार विचारील. विचारीना. आप मुवे पीछे डुबगई दुनिया. कायहो आवडाजी, दहाहजारांची पोंच झालीना ?

**आवडा**—आजच झाली.

**कुळकर्णी**—आपला आश्रय असल्यावर मग मी कोणाला

भीत नाहीं. पण एक मोठी पंचाईत आहे. बादशहाकडून एक वर्षाच्या शेतसाऱ्याच्या सूटीबद्दल दामाजीपंत ठाणेदारांच्या कडून जो वट हुकूम आला त्याचं कसं काय? सारा वसूल करून जिरवायचा कसा?

**बजर०**—किती चमत्कारिक आहांत हो? कसा जिरवायचा म्हणून काय विचारतां? ढेकर देऊन जिरत नसेल तर ओवा नाहींतर डिकेमाली खा!

**मुजूमदार**—हें पहा—दुष्काळासंबंधानं गरीब प्रजेची व्यवस्था करणारा जरी मी अधिकारी नाहीं तरी हरकत नाहीं. मी खजीनदार आहें एवढा हुद्दा आपल्या कामाला पुरे आहे. मी कारकुनाचा बच्चा आहें. सर्व यथास्थित करीन. त्याची काळजी तुम्हांला नको. त्या दहाबाराजणांच्या पट्टीचा वसूल उद्यां इथें आला पाहिजे. हा माझा मावस भाऊ इथें आला आहे. ह्याच्या बरोबर गांवीं रुपये धाडले पाहिजेत. माझ्या वडलांनीं कर्जाचा नुसता बुजबुजाट करून ठेवला आहे.

**कुळकर्णी**—आत्तां पावत्या देत असाल तर वसूल तयार आहे. मी आपली दलाली कापून घेऊन आपल्याकडे सकाळीं रक्कम पोंचती करतों.

**मुजूमदार**—ठीक आहे. नांवांची यादी द्या. पावत्या तयार करून ठेवतों.

**कुळकर्णी**—ही यादी घ्या. दुष्काळांतल्या लोकांकरतां मदत म्हणून बादशहाकडून आलेल्या पन्नास हजार रुपयांपैकीं निम्याची वाट लागली; पण मला त्यांत कांहींच मिळालं नाहीं. आपल्याला मात्र दहा हजार——

**मुजूमदार**—तो व्यवहार त्या भोळ्या दामाजीपंत ठाणेदा-

राच्या मार्फत झाला आहे. तेव्हां त्यांत कांहीं करतां येत नाहीं. तें असो. त्याचं पाहुं पुढें. सध्यां हें तर काम करा.

**कुळकर्णी**–बरं आहे. येतों तर आतां. (जातो.)

**आवडा**–मीही जातें. (जाते.)

**मुजूमदार**– हें जग आज काल मोठं चमत्कारिक झालं आहे. मनुष्यप्राण्याची द्रव्यतृष्णा अनावर खरीच. त्याचप्रमाणें विषयसुख, विलासानं भरलेलं आहे. ह्या जगांत उत्पन्न होऊन, इथल्या नानातऱ्हेच्या भोगांचा उपभोग न घेणं म्हणजे परमेश्वराच्या इच्छेविरुद्धच वागणं नव्हे काय? ह्या जगांतल्या रमणीय वस्तूंचा उपभोग घेण्याची तृष्णा–पूर आलेल्या नदीप्रमाणें वाहिली पाहिजे. त्या पूराच्याच साह्यानं मनुष्य हा संसारसिंधु पोहून आनंदाच्या भरांत पैलतीरीं जातो. द्रव्य ही वस्तु फार महत्वाची आणि नाजूक आहे. लक्ष्मीचा प्रतिपाळ करायला लक्ष्मीवानच पाहिजेत. दरिद्री लोकांना जर तिचं दान केलं तर तिची मिजास राखायला–तिचं संरक्षण करायला–ते बिचारे शिपाईप्यादे, नोकरचाकर, दासदासी–कुठल्या आणणार? बेदरचा बादशहा हूमायूनशहा ब्राह्मणी अगदीं मूर्ख. धान्यच जर पिकलं नाहीं तर पन्नास हजार रुपयांची मदत दुष्काळनिवारणार्थ धाडून उपयोग काय? रुपये चावून भिकाऱ्यांचं पोट भरतं कीं काय? असला हा धर्म अनाठायीं होतो, म्हणून मी दामाजीपंताला किती सांगितलं. पण तोही पंढरपूरचा टाळकुट्याच.

**बजर०**–अगदीं खरं. पण त्यांपैकीं दहाहजार आपण जिरवलेत ते कुठे आहेत? ते रांडेजवळ ठेवणं चांगलं नाहीं. आपल्या मुलखांत जमीनजुमला करून ठेवणं चांगलं. शिवाय, उद्यां सकाळीं तो वसूल येणार आहेच.

**मुजूमदार**–आवडाजीला दहा हजारांचे दागिने करून द्यायचे आहेतना ?

**बजर**०–छेः बुवा–हें नाहीं आपल्याला पसंत. तिच्याकडून आतां दागिने आले म्हणजे ते घरांत वहिनीला देऊन, तिनं नवे करून घालणं चांगलं नव्हे.

**मुजूमदार**–ह्याला एखादी युक्ति काढ पाहूं ?

**बजर**०–मला तुमचा खजीनदार करा म्हणजे युक्ति बेमालुम करतों. तिचे दांत तिच्याच घशांत घालतों.

**मुजूमदार**–कबूल आहे. दे वचन.

**बजर**०–हें घ्या.

**मुजूमदार**–आजपासून तूंच आमचा कारभारी. तूंच खजीनदार. सर्व कांहीं तूं. जा–जाऊन नीज आतां. बरीच रात्र झाली. मीही जातों. ( जातो. )

**बजर**०–द्रव्यतृष्णा म्हणजे जालिम विष आहे. ती एकदां वाढूं लागली म्हणजे विरण गवताप्रमाणें जबरदस्त वाढते. तिला जिंकणं फार कठिण आहे. अळवाच्या पानावर दिसणाऱ्या जलबिंदूप्रमाणें ती सुंदर दिसते. पण त्याच जलबिंदुप्रमाणें एका धक्याबरोबर ती मनुष्याला क्षणार्धांत दृष्टीआड करते. जो ह्या तृष्णेच्या फासांत सांपडली तो मुक्त असतांही बंदीवानच असतो. आपणच तयार केलेल्या जाळ्यावरून कोळी जसा खालीं येतो तसे हे तृषाबद्ध लोक खालीं–अधोगतीला जातात. ज्याच्या वासना प्रबळ त्याची तृष्णा अधिक वाढते. त्यामुळें तो जन्मठेपीचा कैदी बनतो. सर्व दानांत धर्मदानच श्रेष्ठ आहे. जगांत श्रेष्ठ रस म्हटला तर धर्मरसच आहे. खरा आनंद जर सोधला तर तो धर्मांतच सांपडेल. गवत्रानं शेताचा नाश होतो. तृष्णेनं मनुष्याची धूळधाणी उडते. तेव्हां जे तृष्णा-

राहित आहेत त्यांनां अर्थदान करणं काय वाईट? बस्स्–हाच निश्चय? हा मुजूमदार गरिब प्रजेला नाडून अशा दुष्काळाच्या प्रसंगीं तिच्याकडून अनेक नीच मार्गांनीं एकसारखा पैसा खातो आहे. तो पैसा मला उघडपणें, जरी प्रजेचा प्रजेला देतां आला नाहीं तरी संकल्पाप्रमाणें पर्यायानं दामाजीपंताकडून धर्मदाय म्हणून देणार. उद्यांपासून आम्हींच मुजूमदारांचे कारभारी. मग काय? ह्या बाबतींत मला आणि आतां मी जी कृती करणार तिला जर कोणी दोष देणारे असतील, तर ते ह्या नीच, हलकट मुजूमदारासारखेच ठरतील ह्यांत संशय नाहीं. (जातो.)

## प्रवेश तिसरा.

(दामाजीपंत घरांत भजन करीत बसला आहे.)

**दामाजी**–बा मना,

### अभंग

**विठलाच्या पाईं घाली दंडवत ॥ चित्तशुद्धमुक्त होसी तूं रे ॥१॥**
**होसी तूं रे पार संसार सिंधूसी ॥ विठ्ठलनामासी घेई बाप्पा ॥२॥**
**घेई बाप्पा नाम विठ्ठल सदां तें ॥ संसृतीअग्नी तें शमवी सदां ॥३॥**
**शमवी सदां तें विठ्ठलभजन ॥ संसारीं ह्या सौख्य पूर्ण देई ॥४॥**

अहाहा! ही प्रातःकाळची वेळा किती उदात्तरसानं भरली आहे. ह्या देहांतल्या वायूनलिकेमधून गोविंद–गोविंद असा ह्या भोंवतालच्या वायूच्या आघातानं ध्वनि उत्पन्न होऊन ह्या कानांत घुसतो. त्याचं ह्या मनाशीं संभाषण झालं म्हणजे आत्मारामाला जो आनंद होतो तो अवर्णनीय खराच. त्या योगानं हा देह गोविंदरूप होतो. मग गोविंदरूप जो परमेश्वर त्यांत आणि ह्या देहांत अंतर काय? म्हणून–

### अभंग.

**धन्य जे वैष्णव ॥ भजति गोविंद केशव ॥**
**सात्विक ते जीव ॥ मोक्षा योग्य ॥ १ ॥**

वदतों मी मोक्ष ॥ नाहीं कोणापाशीं ॥
एका गोविंदाशीं ॥ शरण रीघा ॥

ध्यानीं, मनीं, जागृतीं, स्वप्नीं—पांडुरंग, पांडुरंग—अशी ह्या मनाची स्थिति झाली पाहिजे. हा देह अनेक स्नायू आणि इंद्रियं मिळून झाला आहे. त्यांनीं आपले विषय सोडून ते विठ्ठलरूप झाले पाहिजेत. तिलाच सहजस्थिति म्हणतात. मोक्ष म्हणजे कांहीं अमृताचं कुंड नव्हे किं जें देव आपल्याला देणार आहे. मनाला जिंकून इंद्रियांचं दमन करणं हाच मोक्ष आहे. त्या पांडुरंगाच्या नामोच्चारांतच तो सांपडणार आहे. जो प्रेमानं विठ्ठलाचं नांव घेईल तो विठ्ठलच होईल. म्हणून आम्हीं--

अभंग.

वर्णूं वाचें तुज विठो ॥ करूं तुझा धन्यवाद ॥
जिकडे पाहे तिकडे ॥ गोविंद तो ॥ १ ॥
माझे मनीं झाला ॥ आनंद विठोबा ॥
लोचनीं देखिला ॥ पंढरीश ॥ २ ॥
तपसाधन न करी ॥ मुक्तीचे सायास ॥
जन्मोजन्मीं गोड ॥ भक्तीरस ॥ ३ ॥
आम्हां उणें नाहीं ॥ संसारीं ह्या कांहीं ॥
सांठवीला हृदयीं ॥ पंढरीश ॥ ४ ॥

( सावित्रीबाई येते )

**सावित्री**—काल पंढरपूरच्या लोकांना अन्नदान केलं ती बातमी सगळीकडे पसरली. त्यामुळें तिकडे ते पहा किती लोक भुकेनं व्याकूळ होऊन अन्न मागायला आले आहेत. आतां ह्या माझ्या दागिन्यांशिवाय माझ्याजवळ घरांत कांहीं नाहीं. हे मोडून त्यांनां अन्नदान करायला काय हरकत आहे ?

**दामाजी**—आपल्या घरीं आलेले अतिथि उपाशी परत धाडणं चांगलं नाहीं. दे ते तुझे दागिने. पण नकोत. तुझे दागिने

ते किती. त्यांनीं काय होणार? वीस पायलींची धारण आज एक शेरावर येऊन बसली आहे, तरी धान्य आहे कुठें?

**सावित्रि**–जेवढं धान्य येईल तेवढंच द्यावं. दुसरा इलाज काय?

**दामाजी**–बरं दे तर ते तुझे दागिने.

**सावित्रि**–अहाहा आज मी किती धन्य आहें. (दागिने देतांना)

( सुवर्णकेतकी० )

अलंकार हे धन्य तशी मी जनसेवा करण्याला ॥
इतुकीं वरुषें बाळगुनी ह्यां देतें सत्कार्याला ॥ ध्रु० ॥
भूषण तुम्हीं दिधलें माझ्या जैसें तें वपुला ॥
द्यावें तैसें अन्नदान जो करि त्याच्या हो कीर्तीला ॥
स्नेह तुम्हाशीं इतुके दिन मीं ह्याच करीतां ठेवियला ॥
आश्रय तुम्हां मिळेल ज्याचा द्या त्या ह्याच मतीला ॥ध्रु०॥

पंढरीनाथा, आज मला अती आनंद होतो आहे. अन्नाकरतां आजपर्यंत नकाराचा शब्द आमच्या घरांत कधींच उच्चारला गेला नाहीं. सत्वहरण होऊं नये म्हणून श्रियाळ राजानं स्वतःच्या मुलाला ठार मारलं. नळदमयंती यांनीं स्वतः दुःख सोसलं. शिबी राजानं आपल्या अंगाचं मांस दिलं. हरिश्चंद्रानं आपल्याला विकून घेतलं. मी तितकं सगळं एकटी करीन.

**दामाजी**–वज्रप्राय कठीण संकटांतून पार पडलं असतां पांडुरंगाच्या भक्तांची कीर्ति पांढऱ्या पताकीप्रमाणें राहते. घे हे आपले दागिने. बादशहाची धान्याची पेवं भरलीं आहेत तीं मी खुलीं करणार. ह्या वेळीं मी राजद्रोहाची पर्वा करणार नाहीं. ( बजरबट्टु येतो. )

**बजर०**–इतक्यांतच असं करण्याची जरूर नाहीं. धारण कितीहि महाग असो. पांच हजारांची रक्कम तयार आहे. ही संपल्यावर बादशहाचीं पेवं दुष्काळपीडितांनां द्या.

**दामाजी**–पांडुरंग, पांडुरंग! पन्नास हजारांपैकीं शिल्लक असलेले पंचवीस हजार आणि हे तुमचे पांच हजार. मिळून तीस हजार. ह्यांवर हा महिना कसा तरी पार पडेल.

**बजर०**–पुढचं पुढें. पुढल्या महिन्यांत सूर्यग्रहण आहे, म्हणून आतांपासून देव पाण्यांत टाकून गोमुखींत हात घालून बसायला नको.

**दामाजी**–विघ्नहर्ता पांडुरंग आहे.

**सावित्री**–तोच संकट निवारील.

**दामाजी**–तुझं म्हणणं खरं आहे. चला तर मग. त्या रानांत जमलेल्या क्षुधितांची आधीं व्यवस्था लावूं. त्यांचे देह पहा कसे ह्या धान्य न प्रसवणाऱ्या जमिनीप्रमाणें सूर्याच्या तापानं ठाळेठिक्कर पडले आहेत. सूर्याचं ऊन जितकं कडक पडतं तितका पाऊस फार पडतो असं म्हणतात. परंतु आज आठ वर्षं इतकं कडक ऊन पडूनही ह्या पावसाळ्याच्या ऋतूंत सुद्धां तीच स्थिति. कोण हें आमचं दुर्दैव. त्या गरीब अन्नार्थी लोकांचे देह तरी किती विलक्षण झाले आहेत पहा. इतकी उष्णता असूनही–

**साकी.**

**गिरिशिखरांतुनि निर्झर वाहे चंड रश्मि असतांना ॥**
**तीच स्थिति ह्या क्षुधित जनांची असतां, घर्म तयांना ॥**
**सोडुनि तो गेला ॥ जलसम निर्जल खडकांला ॥ १ ॥**

(जातात.)

**अंक पहिला समाप्त.**

# अंक दुसरा.



## प्रवेश पहिला.

( स्थल-रस्त्यावर मुजूमदार येतो. )

**मुजूमदार**–द्रव्यतृष्णा आणि दानतृष्णा, हे दोन गुण एकाच्याच अंगीं असूं शकतात; परंतु साधुत्व आणि धूर्तत्व हीं मात्र एकाच्याच अंगीं वास करीत नाहींत. मी महत्वाकांक्षी द्रव्याचा आणि तो दामाजी ईशभजनाचा. मी भोंदु तर तो साधु. मी असत्यवादी तर तो सत्यवादी. मी प्रजेकडून अन्यायानं पैका उकळणारा तर तो उदारतेच्या न्यायानं स्वतःचा पैका प्रजेला धर्म करणारा. इतकंच नव्हे. त्याचा आणि माझा जन्म ब्रह्मकुलांतच. पण एकाच धर्ममार्गांतला माझा फांटा निराळा आणि त्याचा निराळा. मी वीरशैव तर तो वीरवैष्णव. एकंदरींत काय, कीं मी आणि तो ह्या दर्शक, सर्वनामांत नेहमींचाच फाटा. मी आणि तूं म्हणजेच भांडण. खरं पाह्यलं असतां—

( झंपा–भूप. )

प्रखर रविरश्मितें पिउनि शशि शांतसा ॥
सिंधुसुत शोभतो जगतिं खासा ॥ ध्रु० ॥
द्रव्यतृष्णा बहु प्रखर तरि सौख्यसा ॥
तुष्टकरि पुत्र मन जगतिं तैसा ॥
तीच कृति मत्करीं घडलि तरि स्कंदशा ॥
जन्म विक्रमसुता देइ परिसा ॥ १ ॥

सध्यांचीच नव्हे–आरंभापासूनच जगाची ही स्थिति आहे. एकच मार्ग सगळ्यांनीं पतकरणं कधीं चांगलं नाहीं. प्रत्येकानं आपला बचाव पाहून मोठ्या धूर्ततेनं नेमका रस्ता पकडला पाहिजे. सगळेच जर उदार दामाजी व्हायला लागले तर कसं

होणार ? कांहींनीं जर माझा–खाब्रू मुजूमदाराचा मार्ग धरला नाहीं, तर हें जग–एकसारख्या गडबडत जाणाऱ्या उतरणीवरच्या वाटोळ्या धोंड्याप्रमाणें चट्कन् कशावर तरी आपटून त्याच्या चिंधड्या उडतील. म्हणून माझ्यासारखे मधें मधें त्याला अडथळा करणारे प्राणी हवेतच. ( विचार करून ) बरं पण बजरबट्टू अजून कां येत नाहीं ? ( पाहून ) आला वाटतं ! हो तोच. गुलामाचं मुखकमल द्रव्योदयानं प्रफुल्लित झालेलं दिसताहे. ( बजरबट्टू येतो ) यावं–यावं–कसं काय ? तुझ्या तोंडांतून विजयाची बातमी ऐकण्याच्या आधींच–तुझे ते–छाती पुढें काढून पराक्रमाची ऐट दाखवणारे डोळे मला तुझ्या विजयाबद्दल आढ्यतेची हकीकत सांगताहेत. आतां तोंडानं सांगायची जरूर नाहीं. चल–आटप. जा एकदां घरीं. घाल ते तिच्या डोंबल्यावर.

**बजर०**–तसं तर करतोंच; पण आतां आवडाजीचं कसं काय ? उद्यां महालक्ष्मीला तिलाही दागिने पाहिजेत असा तुम्हाला तिनं निरोप सांगायला मला सांगितलं आहेन ?

**मुजूमदार**–मग ते कालचे पांच हजार रुपये काय केलेस ? दे ते तिला.

**बजर०**–हें पहा त्याबद्दल काय करायचं ह्याची मी एक युक्ति अगोदरच करून ठेवली आहे. तिच्याजवळ मी एक कुलुप लावलेली पेटी दिली आहे. किल्लीही तिच्याच जवळ ठेवली आहे. मात्र ती तिनं आपल्या परोक्ष आज संध्याकाळपर्यंत उघडूं नये अशी मी तिला ताकीद देऊन आलों आहें.

**मुजूमदार**–ते पांच हजार रुपये त्या पेटींत आहेत कीं काय ?

**बजर०**–रुपये जरी रोख नाहींत तरी त्यांच्या सहस्रपट किमतीचा एक सोन्याचं अंडं रोज घालणारा राजहंस मीं त्यांत

ठेवला आहे. ( वर पाहून ) अहो पण तोच पहा हा! (एक पांखरूं उडत जातें. ) झालं आपलं काम. आतां तिला दागिने देण्याचं कारण नाहीं.

**मुजूमदार**–तूं मोठा विचित्र आहेस बुवा! हें तूं आतां काय सांगतो आहेस ह्याचा नीट उलगडा कर पाहूं?

**बजर०**–बायका म्हणजे अतृप्त, अधिऱ्या आणि मोठ्या लबाड म्हणतात त्याचंच हें उदाहरण. ती पेटी न उघडण्याची तिनं शपथ घेतली असतां माझ्या मागें तिनं ती कां उघडावी?

**मुजूमदार**–तूं तिच्याजवळ किल्ली कां ठेवावी?

**बजर०**–त्यांतच शहाणपण आहे. बोलून चालून ती रांड. कुलुपाला किल्या करणारे थोडेका रस्त्यांतून फिरत असतात? तिनं दुसरी किल्ली करून घेऊन पेटीचं कुलूप उघडूं नये आणि आपलं काम व्हावं म्हणून तर मीं मुद्दाम माझी किल्ली तिच्याजवळ ठेवली होती.

**मुजूमदार**–ह्यांत तुझं काम काय झालं?

**बजर०**–ती अविश्वासू ठरली.

**मुजूमदार**–ती कशी?

**बजर०**–आपल्या ताब्यांत ठेवण्याकरतां दुसऱ्यानं दिलेल्या पेटीचं कुलूप त्याच्या पाठीमागें आपण उघडून त्याची ठेव पहाणं हा अविश्वास नव्हे का?

**मुजूमदार**–पण त्याशिवाय दुनियेंत श्रीमंत होतां येत नाहीं.

**बजर०**–त्याचमुळें पांच हजारांला मुकावं लागतं!

**मुजूमदार**–तें कसं?

**बजर०**–ह्याचं प्रत्यक्षप्रमाण हवं असेल तर ती पहा–पांच हजारांला आंचवलेली आपली प्राणप्रिया आवडीच इकडे येताहे.

**मुजूमदार**–छेः आतां इथें उभं राहणं चांगलं नव्हे. तूं

तिला फसवली आहेस. ती इथें भर रस्त्यावर दोघांची फजीती करील.

**बजर०**–ती कशी काय ? रोज सोन्याचं अंडं घालणारा माझा राजहंस तिनं मला परत द्यावा. मी तिला पांच हजार रुपये द्यायला तयार आहें.

**मुजूमदार**–धन्य आहे तुझी. खोटं कर्म करून न्यायासनापुढें जें खरं ठरेल असं करण्याची ज्याच्याजवळ अक्कल असेल त्यानंच माझ्यासारख्या पैसे खाण्याच्या कामांत पडावं. तुझी बुद्धी मला असती तर मी करतों आहे ह्यापेक्षां अनेक घोर कृत्यं करून न्यायानं पैसा मिळवतों आहे असंच जगाला दाखवलं असतं. असो. आतां इतउत्तर—

( तरुण कुलिन गोरा० )

**मदिय कुटिल कामीं ॥ त्वदिय मन, मदिय कुटिल कामीं ॥**
**होउरे जलाला, सुखद द्रव्यतरु वाढविण्या नामी ।। ध्रु० ॥**
**चाल ॥ मिरवीन जगीं मी थोर बुद्धिचा तो ॥ हा पुरुष**
**काय मग श्रीमंतांसी भीतो ॥ तो होय मदिय रे रंग देहिचा**
**ह्या तो ॥ सोडुनि ह्या शरिरा, कधीं नच, जाइल बाजारा ॥**
**तूं तसा मलारे वसुनि सन्निधीं देईं सुख धामीं ॥ १ ॥**

जा–तूं तिकडून जा. मी इकडून घरीं जातों. ती पहा थोर थोर मंडळी चावडीवर जमली आहे. त्यांच्यापुढून तिला आपल्या घरीं येऊं देऊं नको. ( दोघे दोन बाजूंनीं जातात.)

---

## प्रवेश दुसरा.

[ चावडी–**दामाजीपंत, अमीन, कुळकर्णी, पाटील** वगैरे लोक बोलत बसले असून, दुष्काळपीडित लोक बाहेर उभे आहेत. ]

**दामाजी**–गरिबन्नवाज हुमायूनशहा ब्राह्मणी यांनीं दरबाराकडून कृपायुक्त मनानें दुष्काळपीडितांच्या निवारणाकरतां

पंन्नास हजारांची मदत केली आहे. प्रजेपैकीं कोणीही दुष्काळ-ग्रस्त दृष्टीस पडूं नये अशी हुजूरची सर्व अधिकाऱ्यांना ताकीद आहे. असं असतां सरकारांतून आलेल्या रकमेची बरीच अफरा-तफर झाल्याचं कळतं. बऱ्याच खेड्यांची फिरती केली; पण सर्वत्र अंदाधुंदी आढळली. शेतपट्टी माफ केली असतां वसूल केल्याच्या पावत्या बघितल्या. हा काय घोंटाळा आहे?

**अमीन**–हमकोभी ऐसा मालूम हुवा है. दोजगेके पाटील कुलकर्णी मैंनें पऱ्हेज किये है. कुइ अकलमंद अव्हीनें एक बडी तरकीबकी शकल निकाली है. उनोने खास तहसीलदार बनके खेतवालेकेपाससे जबरदस्तीसे जमीनपट्टी निकल्कर् खाया है. उस्का तलास चला है.

**कुळकर्णी**–असं ऐकिवांत आहे खरं.

**पाटील**–माज्याबि कानीं असं आलं हाये.

**दामाजी**–अशा त्या दुष्ट माणसाला लवकर सोधून काढा. दुष्काळपीडितलोकांना अशा तऱ्हेनं छळणं हें पातक फार मोठं आहे. हें पहा––

( कवणे तुज गांजियलें० )

स्नेहाविण निस्तेज जसे दीप दीसती ॥
दुष्काळग्रस्त अशां प्राप्त ती स्थिती ॥ ध्रु० ॥
दुष्टमती मनुजांप्रति उपजते कशी ॥
दीनजनां छळण्याला कालिं ह्या अशी ॥ चाल ॥
वृक्षलताहीन रान ॥ प्राण्याविण नगर जाण ॥
भूषांविण कुरुप मान ॥ विद्येविण मानस्थान ॥ चाल ॥
क्षुधितार्थी ह्यांसम कीं, गमति संप्रती ॥ स्नेहा० ॥

पांडुरंगा, काय ही स्थिति! आमच्या बादशहाच्या मनांत प्रजेब-द्दल तूं जशी काळजी उत्पन्न करतोस, तशी लबाड लोकांना पापाचरणापासून दूर होण्याची बुद्धि कां उत्पन्न करीत नाहींस?

यथा राजा तथा प्रजा ! असं म्हणतात. पण सध्यां तर ही म्हण चालू प्रसंगाला बिलकुल लागू पडत नाहीं. बादशहासारखे त्याचें नोकर जर दयाळु असते तर केवढी बहार झाली असती. (मुजूमदार येतात) यावं मुजूमदार! कसं काय, कांहीं नवलविशेष ?

**मुजूमदार**–दुष्काळग्रस्तांच्या मदतीकरतां बादशहाकडून आलेल्या रकमेपैकीं पंचवीस हजारांची रक्कम तिजोरींतून गेली. आतां तितकीच शिल्लक आहे.

**दामाजी**–तें सगळं खरं! पण खर्च झालेल्या रकमेपैकीं पंधराहजारांचा पत्ता नाहीं. हिशेब दहा हजारांचा जमतो.

**मुजूमदार**–काय म्हणतां काय ? हिशेबांत एवढी मोठी चूक !

**दामाजी**–अहो इतकंच नव्हे. ह्या पावत्या पहा. सरकारांतून शेतसाऱ्याची सूट मिळाली असतां, वसूलीच्या पावत्या ह्या पहा !

**मुजूमदार**–आतां मात्र हलकटपणाची कमाल झाली ! असलीं कृत्यं करणारे अधिकारी दिवसाढवळ्या बिन पाण्याच्या ठिकाणीं सुळावर चढवले पाहिजेत. कोण हा हरामखोरपणा !

**कुळकर्णी**–अगदीं खरं.

**मुजूमदार**–खरं म्हणजे, खरंच खरं !

**पाटील**–अशा अधिकाऱ्यांचा हे अमीनसाहेब मोठ्या जारीनं तपास करताहेत. खरा अपराधी एकदां सांपडला म्हणजे संशयाचं बीज नाहींसं होईल.

**मुजूमदार**–देवाच्या कृपेनं असा तो पागल माणूस लवकर सांपडो. नाहींतर हा दुष्काळ तरी जावो.

**दामाजी**–अहो, दुष्काळांत काय किंवा सुकाळांत काय असले लोक एकसारखेच.

**अमीन**–ऐसा अब्बी हमारे नझरमें आता है. लेकिन बराबर दलेल मिलेगा तो अभीके अभी उस्को पऱ्हेज करेगा.

**मुजूमदार**–खरोखर हें फारच मोठं धाडस.

( बजरबट्टू येतो. )

**दामाजी**–पापाचा घडा केव्हांना केव्हां भरतोच. खूना· सारखीं कृत्यं किती जरी खबरदारीनं केलीं तरी दगडांना वाचा फुटून तीं बाहेर पडतात. मग हें कृत्य तर काय हजारों खूनांच्या पेक्षां जबर आहे. बाहेर पडायला वेळ किती लागणार?

**बजर०**–ताबडतोब! जन्माला यायला नऊ महिने लागतात; पण मरण निमिषार्धांत होतं. तसंच हें आहे. पृथ्वीच्या पोटांत कित्येक वाईट धातू आहेत आणि कित्येक चांगल्या आहेत; परंतु धरणीकंपानं त्यांचा जसा एकदम स्फोट होतो, तसंच पृथ्वीवरच्या प्राण्यांचं आहे. श्रीमंत झालेले पुरूष आज कित्येक हयात आहेत. त्यांनां हवंतर विचारावं. दुष्कर्म केल्याशिवाय श्रीमंती येते, असं जर ते म्हणतील तर कांचेची पारदर्शकता घालविणाऱ्या पाऱ्याप्रमाणें ते उष्णतेचे गुलामच ठरतील. थंडीशीं मौन धरणारा पारा जितका गर्विष्ठ तितकेच ते खरं बोलण्यांत समजायला हरकत नाहीं. ह्याचं प्रत्यक्षप्रमाण बघायचं असेल तर ते पहा–अन्नवस्त्राची मैत्री सोडून–जे हालअपेष्टांच्या साम्राज्याचे वारस बनले आहेत असे दीनत्वाची शेखी मारणारे लोक इकडेच येताहेत.

( दुष्काळग्रस्तलोक रडत येतात. )

**दु०लोक**—

( माया जळली कां० )

दाद न राजाशीं, आम्हीं सर्वंहि उपवाशी ॥
प्रजा मरे मग कोण पुसे हो त्या राजाज्ञेशीं ॥ध्रु० ॥

पिळतो आम्हांशीं ॥ घेउनि राजा करराशी ॥
शिक्षा त्याशीं कां नच करिशी देवा नयराशी ॥ १ ॥
अमुच्या पोटांशीं ॥ हरघडि घेती चिमट्यांशीं ॥
अधिकारी जे पगार त्यांचे कां नच कापीशी ॥ २ ॥

**मुजूमदार**–हं–खबरदार! काय हें बोलणं! राजद्रोहासारखा अपराध लादला जाईल. माहीत नाहीं?

**बजर०**–अलबत्–पुन्हां जर खरं बोलाल तर खास उपाशी मराल. सध्यां खरं बोलणं म्हणजे जसा अपराध होतो तसाच खोटं बोलणं म्हणजे न्याय ठरतो.

**दामाजी**–हें ह्यांचं बोलणं अगदीं खरं आहे. लोकनायकांना ह्यामुळेंच अनेक विपत्ती भोगाव्या लागतात.

**बजर०**–तशा विपत्ति जर लोकनायकांनां आल्या नाहींत तर राष्ट्राला ऊर्जित दशा येणंच नाहीं.

**दामाजी**–खरं आहे. असे थोर पुरूष विपत्तिग्रस्त होऊन ठार झालेच पाहिजेत.

**बजर०**–बरोबर आहे. ते जर ठार न होतील, तर पारतंत्र्याची नदी ओलांडण्याची इच्छा धरणाऱ्यांनां त्यांच्या हाडांशिवाय कसला भक्कम पूल मिळणार?

**दामाजी**–खरोखर अशा थोर सत्पुरुषांची हाडं फारच पवित्र. तीं हाडं––

( दृष्टिभरे जलभारे० )

पारतंत्र्यसरिता ती, नेती, तरुनी ती, मग देती, सुखदस्वातंत्र्यप्राप्ती ॥ ध्रु० ॥ स्वजनसुखातें स्वहिता विसरति, धन्य पुरुष ते जनपति या जगिं होती ॥ १ ॥ राजकृपेला मुकती ते तरि, विपत्ति देई तत्प्रति अंतीं मुक्ती ॥ २ ॥ धरुनी अंतरिं स्वदेशसेवा, करोत जनहित ते योजुनि ही युक्ती ॥ ३ ॥

**दु०लोक**—अहो महाराज, आमच्या पोटाला कांहीं द्या.

**दामाजी**—मुजूमदार, तिजोरींत अद्याप पंचवीस हजार रुपये शिल्लक आहेतच. ते आणि मी पांच हजार देतों. ते मिळून तीस हजारांचा बटवडा आज संध्याकाळच्या आंत झाला पाहिजे.

**मुजूमदार**—ह्यावर कसे तरी पंधरा दिवस जातील. पुढली व्यवस्था काय?

**दामाजी**—पुढचं पुढें पहातां येईल. बरं अमीनसाहेब, ज्या लबाडानं गरीब शेतकऱ्यांपासून शेतपट्टीचा वसूल सरकारच्या नांवावर करून खोट्या पावत्या तयार केल्या आहेत, त्याला लवकर शोधून काढा.

**अमीन**—आपके हुक्मके मुआफिक सब कुच्छ बराबर करताहै.

**मुजूमदार**—अशा ह्या दुर्भिक्षाच्या काळीं असलं हें अचाट कर्म करून श्रीमंत होण्याची इच्छा धरणाराला योग्य शासन झालंच पाहिजे. कोण हें घोर कर्म!

**बजर०**—अलबत्, फारच घोर कर्म. असं कर्म करणाराला तापवलेल्या सांडसांनीं टोंचटोंचून ठार केला पाहिजे.

**दामाजी**—छे छेः! असं करण्यानं मनुष्यपणा जाऊन असुरीपणा अंगीं येतो.

**मुजूमदार**—ठाणेदारसाहेबांचं म्हणणं खरं आहे.

**दु० लोक**—महाराज, भूक!

**दामाजी**—मुजूमदार, चलावं आतां आपण! ह्या लोकांची व्यवस्था लावा.

**दु०लोक**—

(म्हातारा इतुका०)

**तारी दीनां त्यास ॥ देवो पांडुरंग सुखवास ॥**
**घाली मुखिं अन्नास ॥ देवो० ॥ दुष्काळांतिल**

प्राणी राखुनि मिळवी जो सुवचास ॥ प्रसन्न
त्यावरि ईश होउनी ॥ नेतो वैकुंठास ॥ देवो० ॥
दुष्ट लोक किति सुष्ट भासती, तुष्ट न ते गरिबांस ॥
करुनी, मिळविति शाप,जाति ते खचितचि हो नरकास॥देवो०
दीनजनांचा कल्पद्रुम हा दामाजी नर खास ॥
ईशदयेनें अवतरलासे, तारी हा आम्हांस ॥ देवो० ॥

पुंडरीक वरदे हरि विठ्ठल! ( दुष्काळग्रस्त लोक जातात.)

**बजर०**–ह्या लोकांनीं आतां जे शब्द उच्चारले ते कितपत खरे मानावेत याची शंकाच आहे. दुष्कर्म करणाऱ्या लोकांनां मरणसमयीं पश्चात्ताप होतो. जे सत्कर्म करणारे आहेत त्यांनां पश्चात्तापाची जरूरच नाहीं. पश्चात्तापानं शुद्धी होऊन जर स्वर्गसौख्य मिळतं, तर हवं तें घोर कर्म करून, विष्णवेनमो, विष्णवेनमो विष्णवेनमः! असा त्रिवार उच्चार केला म्हणजे झालं. पापमुक्त व्हायला वेळ तो किती?

**मुजूमदार**–तुला जर इतकं कळतं तर संसारांत कशाला राह्यला आहेस?

**बजर०**–कोण, मी अन् संसारांत आहें म्हणतां? अगदीं झूट. मी कोण आहें? सगळ्यांत मी असून सर्व जरी माझ्यांत आहेत, तरी मी सर्वांहून निराळाच आहें.

**मुजूमदार**–म्हणजे काय?

**बजर०**–ह्याचा अर्थ परमेश्वराशिवाय कोण करणार? कर्ता-करवता तो एकच आहे.

**मुजूमदार**–बरं चल आतां. दुष्काळपीडितांची योग्य व्यवस्था लावली पाहिजे.

**दामाजी**–खरंच. जाच आतां तुम्हीं. तुम्हीं सर्व व्यवस्था

योग्य करालच. पण हें पहा–तुम्हांला सांगायला नकोच म्हणा. पण सांगतों.—

( स्वार्थी जी प्रिति० )

ठेवा कीं नीति तरुची ती परहितीं ॥ ध्रु० ॥
स्तेन स्वहितीं रतसे गमती ॥ परहित परि जपती ॥ १ ॥
करसंस्पर्शें लाजाळूचीं दलवदनें मिटतीं ॥ २ ॥
सज्जन तैसे पिशुनापुढतीं नेत्र मिटुनि बसती ॥ ३ ॥

( मुजूमदार आणि बजरबट्टू जातात. )

**पाटील**–हे अमीनसाहेब आपल्या मताप्रमाणें करणारच आहेत. मीही खबदारी करून असला लुच्चा माणूस सोधून काढतों.

**कुळकर्णी**–परवां नुकताच तो हिराचंद सावकार मेला. त्याला वारस नसल्यामुळें त्याची जिंदगी सरकारांत जमा झाली. त्यावेळीं मुजूमदारांनीं मध्यस्ती करून उघड उघड दलाली खाल्ली हें बरं; पण अशा लबाडीनं खोट्या पावत्या तयार करून प्रजेला जुलमानं लुटणं चांगलं नाहीं. असा कोण चोर असेल तो आतां हे अमीनसाहेब काढतीलच सोधून.

**अमीन**–ऐसा बूरा काम करनेवाला अक्षी बडा अकल्मंद् रह्यता है; लेकिन् ऐसा पाप बहुत दीन परदेके पीछे छुपता नहीं. कुइदीन् तोबी किसीके नजर आता है. इतना बडा-गुन्हा करनेवाला जो कुइ है उस्को साथीदार जुरूर होना चाहिये. लेकिन् कुच्छ् परवा नहीं. ऐसा बूरा काम करनेवाला पादशहाका एक बडा अफ्सर है ऐसा मुजे शक आया है. बहोतही थोडे आरसेके अंदर उस्को हम् प-हेज करके आपके साम्ने लाएगा इस्मे बिल्कुल् शक नहीं.

**दामाजी**–असा गुन्हेगार तुम्हाला सांपडल्याबरोबर माझ्या-

कडे आणा; नंतर पुढची व्यवस्था. पुढें काय करायचं तें ठरवूं. नेहमींचा जगाचा न्याय फार चमत्कारिक आहे. ह्या खोट्या पावत्या पहा आणि ती तहानेनं व्याकुळ होऊन परोपकाराकरतां तडफडत पडलेली शेतजमीन पहा. हा कागद रंगानं पांढरा शुभ्र आहे. ती जमीन काळी भोर आहे. सध्यांचं ह्या कागदाचं स्वरूप जरी खरं भासतं आहे तरी तें नाटकांतलं सोंग असून, ह्याचं हृदय काळं आहे. पण ह्या जमिनीची गोष्ट तशी नाहीं. हिचा वर्ण काळा आहे; परंतु अंतःकरण गोमातेच्या शुभ्र दुधाप्रमाणें जगावर उपकार करणारं आहे. एकंदरींत काय कीं,--

साकी.

दिसतें जें तें तैसें असतें होतें तरि बहु नामी ॥
नसतें तैसें उपाय त्याला नाहीं कीं वदतों मी ॥
विठ्ठलकृति सारी ॥ उमजा तुम्हिहो नरनारी ॥ १ ॥

( सर्व जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

[ रस्त्यावर-आवडाजी नायकीण येते. ]

आवडा—

( उद्यां बघ जातें० )

असे किति खोटी ॥ नरजात निंद्य ही कपटी ॥ ध्रु० ॥
दावुनि धनलोभ किं आम्हाला ॥ फुलविति अमुच्या
प्रेमझऱ्याला ॥ व्यसनीं घालिति स्त्रीबुद्धीला ॥ स्वहि-
तासाठीं ॥ कपटजन्म यांच्या पोटीं ॥ असे० ॥

केवढी ही मेल्यांची लबाडी. पण मला तरी अशी भुरळ कां पडावी! रोज सोन्याचं अंडं घालणारा राजहंस ह्या पेटींतून उडून गेला. आतां तो जर त्या मेल्यानं परत मागितला तर

मी कुठला देऊं? राजहंस दिल्याशिवाय पांच हजार रुपये देत नाहीं. असं जर तो बजरबट्टू मला म्हणाला तर माझी फेंफेंच नाहींका होणार! दागिने गेले. पांच हजार रुपये गेले. तो राजहंसही हातचा उडून गेला. आतां काय करावं? केवढी ही मी अविचारी! आपल्यापाशीं दुसऱ्यानं ठेवायला दिलेली ठेव आपण त्याच्या मागं उघडून पाहिली म्हणजे अन्यायचा अन्याय होऊन हें असं सर्वस्वाला मुकावं लागतं! बरं पण आतां ह्यांतून पार कसं पडावं? (विचार करून) हं असंच! त्या बजरबट्टूला आपलासा करून घ्यावा. तो मोठा युक्तिबाज आहे. अग बाई, पण हा पहा—आठवण होतांच स्वारी तयार. (बजरबट्टू येतो.) तुमची अगदीं पुरी शंभर आहेत.

**बजर०**—तें मी ओळखून आहें. तात्यापंतोजीच्या शाळेंत धूळाक्षर शिकणारीं मुलं फारच हुषार! आपल्या वर्गांतली मुलं जर कोणी मोजूं लागला तर वर्गांचा अभिमानी मुलगा पोरं मोजूं नको म्हणतो. ह्याचा अर्थ तुला माहीत आहे का?

**आवडा**—हो हो.

**बजर०**—काय तो?

**आवडा**—वर्गांचा अभिमान.

**बजर०**—छेः अगदींच खोटं. अभिमानाची दुनिया खोटी. अभिमानही खोटा.

**आवडा**—सांगा पाहूं तर मग त्याचा अर्थ? मला काय तो अर्थ कळणार?

**बजर०**—काय, तुला अर्थ कळत नाहीं? अग, अर्थाकरतां तर ही तुझी सारी खटपट! हें बघ वर्गांतलीं पोरं मोजणारा जो असतो तो स्वतःला विसरतो. आणि नंतर हजीरीपत्रकांत संख्या कमी येते. ही इथली मंडळी मी जर मोजायला लागलों तर माझ्या

नांवाचं बोट घालायला मी विसरेन. तेव्हां हें पहा, तूं स्वतःला विसरलीस म्हणून तर अर्थाला घसरलीस.

**आवडा**–यापुढें तुम्हींच माझे गुरू व्हाना ?

**बजर०**–नको–तुझा तो सुंदर प्रेमाचा गोठा, ती माषुक प्रीतीची गव्हाण आणि तें तुझ्या मोहाचं दावं–नकोरे बाबा ! एकदां गळ्यांत अडकलं कीं, झालोंच आम्हीं सांभापुढले.

**आवडा**–मग तर मग माझे भाऊ म्हणून मला अक्कल शिकवा.

**बजर०**–काय तुझा भाऊ होऊं म्हणतेस ? वाहवा ! मग तर काय आमची कीर्ति पुसावी ! तुमची गिऱ्हाइकी पटवण्यांत आमची अक्कल जाईल झिजून. अन् मग काय ? गीर खाऊन उरलेली ही पपनसाची साल आम्हीं राहणार. बरं पण कायग, ती माझी पेटी कशाला बरोबर आणली आहेस ? दे पाहूं इकडे. ( हातांत पेटी घेऊन ) आंतली ठेव सुरक्षित आहेना ?

**आवडा**–हो हो. अगदीं सुरक्षित आहे.

**बजर०**–मग आतां इथें रस्त्यांत उघडून बघायची जरूर नाहीं ?

**आवडा**–छेः मुळींच नाहीं. संभाळाहो आपली पेटी ! आलीना ?

**बजर०**–कां बजावूनशी सांगतेस ? कांहीं आहे वाटतं ? ह्या तुझ्या बजावण्याचा संशय येतो.

**अवडा**–संशय कसला ? ज्याची त्याला जशीच्या तशी ठेव परत देतांना बजावून देण्याची चालच आहे.

**बजर०**–असं काय ? तर मग हें पहा. भर चवाठ्यावर मीं कांहीं ही ठेव तुझ्याजवळ दिली नाहीं. तेव्हां आतां इथें परत तरी कशी घेऊं ? कारण, अशी चाल नाहीं. पेटींतली ठेव दाखवून जशी ही तुझ्या ताब्यांत दिली होती तशीचीतशीच परत घेईन. घे ही परत.

**आवडा**–नकोहो. इतका का विश्वास नाहीं ?

**बजर०**–छेः हो, मुळींच नाहीं. बायकांचा विश्वास धरला कीं, विश्वामित्राप्रमाणें कुत्रं व्हावं लागतं कुत्रं.

**आवडा**–मी जातें आहे मुजूमदारांकडे. तिथें कशाला ही पेटी बरोबर घेऊन जाऊं ?

**बजर०**–उद्यांच्या महालक्ष्मीच्या सणाकरतां तुला शालू पाहिजे आहेना ? मी जातों आहे बाजारांत.

**आवडा**–असंका ? बरं तर. लवकर घेऊन याहो. मी मुजूमदारांच्याच घरीं आहें.

**बजर०**–( पेटी देऊन ) येतों मी आतां . ( जातो. )

**आवडा**–खरंच किति तरी लुच्चा आहे हा ! ह्याच्याशीं लुच्चे-गिरी लढवल्याशिवाय कांहीं चालायचं नाहीं. जशाला तसंच केलं पाहिजे. म्हणजे योग्य न्याय होऊन, रस्ता साफ होतो. संसाराचा स्वभाव हाच आहे. चहूंकडे जर पाह्यलं तर–

( भो सदया० )

**गरलातें विष खातें न्यायचि होय सत्य समजा हा ॥**
**यास्तव नरउरिं योजिन मत्सरिच्या ॥ सुरिला धरुनि**
**करीं ॥ दाविन स्त्रीच्या चरिता पुरुषमदा हरवाया ॥**
**धाडस माझें रक्षो अच्युत तें ॥ विक्रम मज वरुनी ॥**
**परजित मत्पदिं अरि ते आणावे कामदुहा ॥ १ ॥**

( जाते. )

---

## प्रवेश चवथा.

[ घरांत **मुजूमदार** आणि **पार्वती** बोलत बसलीं आहेत. ]

**पार्वती**–ही टीक जर आज आली नसती तर कांहीं ठीक नव्हतं.

**मुजूमदार**–टीक दिली म्हणून ठीक नाहीं झालं. ठुशी दिली म्हणून तर तूं आज खुशी आहेस. पण खरं सांग. ती सरी तुला आवडलीना.

**पार्वती**–ही सरी कित्ती तरी आहे बरी. पण हा चंद्रहार कनी–

**मुजूमदार**–काय म्हणतेस ? चंद्रहारानं राग जाऊन अगदीं गार झालीस ?

**पार्वती**–अगदीं खरं. तुम्ही माझी गार व्हायचीच वाट बघतांहात. पण देवाला कुठें दया येते आहे माझी.

**मुजूमदार**–गार नाहीं तर काय ऊन झालीस म्हणूं ? छेः बुवा. ह्या बायका म्हणजे मोठ्या कठिण. रागावणं आणि हंसणं हे दोन गूण स्त्रीजातीबरोबरच प्रथम जगांत आले असावेत असं वाटतं.

**पार्वती**–तर मग सारे पुरुष चोरटे आहेत असं म्हणायला हरकत नाहीं ?

**मुजूमदार**–ह्यावरून बायका जर साव ठरतात, तर आवडीही बायको नाहीं का ? तिला तूं चोरटी कां म्हणतेस ?

**पार्वती**–ती बायको असली म्हणून काय झालं ! ती कसबीण आहे.

**मुजूमदार**–शाबास. तुझ्या बोलण्यांत, ह्या वाक्याचा संबंध त्या वाक्याशीं चांगलाच जमतो. बरं पण आजच्या महालक्ष्मीची सगळी तयारी झाली आहेना ? आपल्या बजरबट्टूच्या अंगांत येतं हें तुला माहीत आहेका ?

**पार्वती**–म्हणजे ? पुरुषांच्या अंगांत बायका कशा येतील ?

**मुजूमदार**–अग, बायकांच्या अंगांत पुरूष येतात तशाच.

**पार्वती**–हें बाई मी आज नव्यानंच ऐकतें आहें. ढोंग असेल सारं झालं, दुसरं काय ?

**मुजूमदार**–अग ढोंग कसलं? तो मुठींतून हळदकुंकु काढतो.

**पार्वती**–काय मेली सारी थट्टा करायची झालं. देवाच्या कामांत सुद्धां थट्टा.

**मुजूमदार**–बरोबरच आहे. प्राणीमात्रच जर परमेश्वराच्या थट्टेचा परिणाम आहेत तर थट्टेची थट्टा व्हायला काय हरकत आहे ?

**पार्वती**–तर मग अंगांत येण्याची थट्टाचना ?

**मुजूमदार**–फार कशाला ! स्वतःचा स्वभाव बघायला आरशाची काय जरूर ? काय खरा प्रकार आहे तो आज रात्रीं दिसेलच. जा तूं आतां घरांत. त्या बायका बघ कोण आल्या आहेत.

**पार्वती**–पैठणी केव्हां येणार ? मोठ्या गोलाची हवी !

**मुजूमदार**–अगदीं तुझ्या तोलाला गोल साजेल अशीच आणायला सांगितली आहे. पदर कसा लफ्फेबाज नारळी. घटका अर्ध घटकेंत येईल.

( **पार्वती** जाते व **आवडा** येते.)

**आवडा**–हें पहा, आतांशें आपण चालवलेलं कपटाचं वर्तन कांहीं ठीक नाहीं बरंका ? इतका मानभावीपणा असेल असं पहिल्यांदाच जर कळलं असतं तर मी मैत्रीच केली नसती.

**मुजूमदार**–अरेच्या-पण आज एकदम असं झालं आहे काय ? आमच्या मैत्रीचा एवढा पश्चात्ताप काय झाला ?

**आवडा**–काय झालं तें तुमच्याच बजरबट्टूला विचारा. त्यानं मला सर्वस्वी नागवलीन् !

**मुजूमदार**–काय म्हणतेस, नागवलीन् ? अन् हें लुगडं कुठलं आणलंस मग ?

**आवडा**–ही थट्टा विकोपाला जाईल बरं !

**मुजूमदार**–पण झालं काय तें तर सांगशील पुरं !

**आवडा**–ही घ्या पेटी. ह्या पेटीमुळें आज मी सर्वस्वीं फसलें.

**मुजूमदार**–असली ती फसवी पेटी तुला हवी कशाला? दे ती फेंकून. (बजरबट्टू एक गाठोडें घेऊन येतो.)

**बजर०**–आतां फेंकून देऊन उपयोग काय? पेटी माझी–ठेवली आवडीपाशीं आणि फेंकून द्यायला सांगतां तुम्हीं. म्हणजे हा बरा आहे साराच उचल्यांचा बाजार. त्यांतला माझा रोज एक सोन्याचं अंडं घालणारा राजहंस मला परत कां मिळूं नये?

**आवडा**–तो उडून गेला त्याला मी काय करणार.

**बजर०**–तो गेला तसे पांच हजार रुपयेही गेले.

**मुजूमदार**–ही फिटंफाट चांगली. बरं पण तो शालू कसा काय आणला आहेस तो पाहूं? (शालू घेऊन) हा आवडतो का तुला?

**आवडा**–न आवडायला काय झालं? पण उपयोग काय त्याचा?

**बजर०**–नेसायचा.

**आवडा**–ह्याच्या किमतीचे दागिने नकोतका?

**मुजूमदार**–सुंदर माणसाला दागिन्यांची जरूर काय? सद्गुणांचा एकच तन्मनी त्यांनां अनेक दागिन्यांपेक्षां पुरे होतो.

**आवडा**–असं आहे तर मर्यादेच्या वस्त्रापेक्षां ह्या शालूची किंमत ती काय?

**बजर०**–मी तेंच म्हणणार होतों. तुझ्याजवळ भीडेची शाल आणि मर्यादेचा शालु असल्यावर तुला ह्या वरपांगी शालूची जरूर काय? आण इकडे तो. दुकानदाराकडे पोंचता करतों.

**आवडा**–आम्हां दोघांत तुम्हाला बोलायचं काम काय?

**बजर०**–मी अक्कल विकायची पेढी काढली आहे. मुजूमदारांचं वकीलपत्र मी घेतलेलंच आहे. शिवाय तुझंही घेण्याबद्दल तूं मघांशी रस्त्यांत माझी विनवणी करीत होतीसच. तेव्हां आतां सांग पाहूं? मी मध्यें बोलतों आहे हें ठीकच आहे ना?

**आवडा**–असं जर आहे तर मी पांच हजारांला बुडलें आहें ती तरेन कशी तें सांगाना ?

**बजर०**–तुला कुंभाराच्या चाकावर घालून घेतलं पाहिजे.

**आवडा**–म्हणजे काय होईल ?

**बजर०**–तुझ्या पोटांत बद्‌चालीचं जें पाणी शिरलं आहे ते निघून तुझ्यांत सुशील स्त्रीचं शिरेल.

**आवडा**–मग पांच हजारांचं काय ?

**बजर०**–स्त्रीचा सुशीलपणा मोठा अमोल आहे. तो जर आज पांच हजारांला मिळतो आहे तर पांचच काय पन्नास हजारांच्या थैल्या देऊन तुझ्या सारख्या कित्येक बायका माझ्या पायां पडतील.

**आवडा**–इतकी कांहीं मी भोळी भाबडी नाहीं समजलं. कोणच्याना कोणच्या तरी तऱ्हेनं मी आपले रुपये वसूल करीन हें पक्कं लक्षांत ठेवा.

**बजर०**–वसुलीचा प्रवाह रोजचाच सुरू आहे. जी नेहमींचीच सोळी तिला कशाला हवी मुक्टा न् धाबळी.

**आवडा**–माझी नेहमीं अशी थट्टा करायला तुम्हांला सनद कां मिळाली आहे ? मी जातें आपली. सर्व तऱ्हेनंच जर नाडायला लागलं तर मनुष्य काय करणार ?

**मुजूमदार**–अशी रागावतेस काय ? जरा शांत हो. दामाजीपंत ठाणेदारांचा हुकुम सुटला आहे. तीस हजारांचा बटवडा ताबडतोब व्हायचा आहे. त्यांतले दहा हजार पचवतां येणार नाहींत कीं काय ?

**आवडा**–तुमचे ते तीस असोत कीं छत्तीस असोत. मला काय करायचं आहे ?

**बजर०**–काय करायचं आहे ? मागला आंकडा पुढें घ्यायचा आहे हें आम्हांला कळतं.

**मुजूमदार**–जाऊंदेरे. रागावलेल्या माणसाच्या वाटेस जाणं बरं नाहीं.

**आवडा**–मला रागावलेली म्हणतां, पण हें तुम्हांला शोभतं का ? आज चारचौघांत मी बुची गेलें म्हणजे मला लोक काय म्हणतील ?

**मुजूमदार**–काय म्हणणार ! तूं हवीतशी हवी तिथें जा. ह्या मुजूमदाराची आवडती आवडीच तुला म्हणतील. (पार्वती एकदम बाहेर येते. )

**पार्वती**–काय म्हटलंत ? ती तुमची आवडती अन् मी कोण ?

**मुजूमदार**–तूं माझी लाडकी आवडती पार्वती. तुला काय कमी आहे ?

**पार्वती**–पण ही सटवी इथें कां आली. आमच्या घरीं यायचं नाहीं म्हणून मी सतरा वेळां सांगितलं असतां, पुन्हां पुन्हां कां येते ही ? कायग ए सुडके आवडे, बोल, कां, आतां कां तोंड शिवलं. हा शालू घ्यायला आलीस होय ? आण तो इकडे.

**बजर०**–तुमच्याकरतां पैठणी आणली आहे. ही घ्या.

**पार्वती**–आण ती हिकडे. मला तीही पाहिजे आन् तोही पाहिजे.

**आवडा**–हें पहा पार्वतीबाई, आजपर्यंत मी गप्प बसलें. तुमचं बोलणं ऐकून घेतलं. मार खाल्ला. वाटेल तें केलं. पण आतां मात्र ऐकायची नाहीं. तुम्ही घरगुती बायका आणि आम्हीं बाजारबसव्या. तुम्हांला जर अब्रूची चाड असेल, तर मुकाट्यानं इथून चालत्या व्हा. नाहींतर माझ्याशीं गांठ आहे. ध्यानांत ठेवा.

**मुजूमदार**–अहो, आवडाजी, हें मात्र मला खपायचं नाहीं अँ! सांगून ठेवतों. आपल्या मर्यादेनं रहा. माझ्या देखत कोणाला जरबेच्या गोष्टी सांगतां? प्रत्यक्ष माझ्या बायकोला?

**आवडा**–अलबत्, कां नाहीं सांगणार? माझ्या मेहनतीनं मी मिळवलेलं द्रव्य तुम्हीं उपटलंत. नवराबायकोनीं मिळून गिळंकृत केलंत. आणखी मलाच उलट्या गोष्टी सांगता होय? मुकाट्यानं माझे दागिने द्या–नाहींतर पुढली गत पहा.

**मुजूमदार**–कां जीभ फारशी लवलवते आहे? एखादी मुखश्रींत पाहिजे आहे वाटतं?

**आवडा**–उलट मिळाली म्हणजे अब्रु कोणाची जाईल?

**मुजूमदार**–अग पण असं काय करतेस? जरा धीरानं घे.

**पार्वती**–काय–माझ्या देखत तिच्याशीं लडिवाळपणा करता? दम धरा. ह्या रांडेची खोडकीच मोडली पाहिजे. (जाते.)

**मजूमदार**–बरं झालं गेली एकदांची पीडा.

(पार्वती मुसळ घेऊन येते.)

**पार्वती**–'गेली एकदांची पीडा' काय? जाइल कशी पीडा? जन्माच्या गांठी पडल्या आहेतना? कायग ए सठवे–

(ए सरवर बरतर०)

**पार्वती**–जा तनुमन घेउन झटकन एथुन ध्यामीं धरि मुसळा ॥
**आवडा**–देवा धावा पावा ॥ सर्वस्वीं ही दीन ॥ झाली
अबला मान ॥ नुतीस दे मान ॥ साह्यास धांवून ॥
**पार्वती**–साह्य करी नच देव खळां ॥ जा तनुमन० ॥
**मुजूमदार**–शांतीस वरिगे प्रेमकरे ॥ नातरि ठरेल तें अपुरें ॥
**पार्वती**–नरांच्या प्रीतींत ॥ थारा ना लज्जेंत ॥ थोतांड लग्नांत ॥
शपथांनां त्या तरि जाळा ॥ जा तनुमन०॥
**मुजूमदार**–चित्त शांत करी प्रिये ॥ क्रोध मानसीं न ये ॥
**आवडा**–कांचनास सांत्वनास ॥ गिळिलें सारें सुखिं लोळा ॥
**पार्वती**–जा तनुमन० ॥

**आवडा**—सगळाच चोमड्यांचा बाजार आहे. ह्या सगळ्यांचीच काय गम्मत आहे ती पहातें आतां. ( निघून जाते व तिच्या मागें **पार्वती** जाते. )

**मुजूमदार**—फार वाईट गोष्ट झाली. आमच्या कारस्थानांतली हीच मुख्य आहे. आमचे सगळे डावपेंच हिला माहित आहेत. ही जर फुटली तर आमचं प्रारब्ध फुटलंच म्हणायचं. शंकरा, मी तुझी उपासना किती कडक चालवली आहे हें तूं जाणतोच आहेस. माझी तुला दया आहेच. तूं भक्तकामकल्पद्रुम आहेस. म्हणून आवडीला कोणच्याही तऱ्हेची वाईट बुद्धी देऊं नको.

**बजर०**—असे भितां कां? आजपर्यंत स्त्रीचरित्राला जगांत लोक भीत होते. आतां पुरुषचरित्राला भीतील असंच करूं म्हणजे झालं. जग आतांशा उलट चाललं आहे हें आपण विसरलांत वाटतं? पूर्वीं बायका बांगड्या घालीत असत. पण सध्यां कड्यांच्या ऐवजीं पुरूष बांगड्या घालतात हें नाहींका तुम्हीं पाह्यलं?

**मुजूमदार**—अरे बाबा, तुझ्या सारख्या अलौकिक बुद्धीचा प्राणी जरी माझ्या साह्याला आहे, तरी कोणच्याही कामांत देवाचं साह्य जरूर पाहिजे. कैलासनाथा, तूं स्वतःच्या पुत्रापेक्षांही भक्तांवर अधिक प्रेम करतोस असा तुझा लौकिक आहे. तुझा मुलगा जो कार्तिकस्वामी तो जसा शूरांत शूर तसाच चौर्यशास्त्राचा आदिगुरु असा प्रसिद्ध आहे. तेव्हां—

( श्रवणिं पडो तव० )

**शिवारे तुला मी रोज भजोनी ॥**
**स्तुतीतें करीतों प्रेम धरोनी ॥**
**म्हणुनि तदिय दास न्यावा तारुनी ॥**
**तव सुत तो स्तेनपती॥ स्कंद तयावरि तोषित राहसि ॥**
**भक्त किं तूंतें तदधिक गमती ॥ खासरे यास्तव मदीय—**
**वरिरे ॥ करिच कृपेला हीच प्रार्थना होय॥तुझ्या पदीं॥१॥**

## प्रवेश पांचवा.

[ रस्त्यावर आवडा येते.]

आवडा–

(जानसे मै सतके०)

हृदय पहा फुटलें न तरलें समुळचि मी पडलें ॥
मी शोकीं किति रडत, दैव तें परि निर्दय कसलें ॥
देई छळुनि त्रास मातें सुचत नच कांहिं उपाय कसे ॥
स्त्रीचरिता विजया न मिळुनी पुरुषाचि यशयुतसे ॥ १ ॥

पण असं धीर सोडून काय होतं. आजपर्यंत कसोटीला लागून जें स्त्रीचरित्र बावनकशी ठरलं तें ह्या प्रसंगीं कमी दराचं कसं लागावं! छेः ह्यांत कांहीं तरी ताव देण्यांत कमतरता झाली आहे. आतां अखेरचा ताव देऊन–

( झंपा )

गजगती पुढति त्या अश्वचाली ॥ टिकति कां दावितें ह्याच
कालीं ॥ ध्रु० ॥ ठकविलें मजसिं परि फसवितें त्यांस मी ॥
स्त्रीमती पुढति त्या पुरुषचरिता ॥ वदन खालीं पहा घालुनी
चालवी ॥ मत्कृतीनें होइ मी विजयशाली ॥ १ ॥

असं तर करणारच. पण तो मेला बजरबट्टू माझ्या तावडींत सांपडला पाहिजे. तो जर मुजूमदाराजवळ राहील तर माझं काम शेवटास जाणार नाहीं. तो मुजूमदार म्हणजे उथळबुद्धीचा. आजपर्यंत माझ्याच अकलेच्या जोरावर त्यानं पैका मिळवला. हा बजरबट्टू पक्या बुद्धीचा लफंग्या त्याला मिळाल्यामुळें आज माझी ही स्थिति झाली आहे. तो माझ्या तावडींत सांपडला पाहिजे. ( पाहून ) अगबाइ, तोच इकडे येतो आहे. खरंच इतका वेळ माझ्या विरुद्ध झालेलं माझं दैव मला आतां अनुकूल व्हायला लागलं असं म्हणायला हरकत नाहीं. देवा, गोपालकृष्णा,

( तुजे मेरी कसम० )

मजप्रती करीरे साह्य अशा ह्या कामीं ॥
मथुरेंतिल गोपी कामीं ॥ सदय तूं होसि मुरदमी ॥
तैसा मला रे होइ मी तुला नमीं ॥ ध्रु० ॥

( बजरबट्टू येतो. )

**बजर०**—छेः बुवा. तुझं चालणं खरंच गजगतीचं. मी इतक्या घाईनं पळत आलों तेव्हां तूं अखेरीस तुझ्या घरापुढें भेटलीस. तुला गांठायला इतके श्रम लागतात हें नव्हतं बुवा आपल्याला ठाऊक.

**आवडा**—छेः मला गांठायच्या भानगडींत आतां कुणीही पडूं नये. मी आतां कधीं कोणाला गांठली जाणार नाहीं. मनुष्य एकदां फसत असतं.

**बजर०**—अगदीं खरं. तूं जर एकदां फसली नसतीस तर आतांसारखं शहाणपणानं बोललीच नसतीस.

**आवडा**—पण तुम्ही इतके धांवत कां आलांत ?

**बजर०**—काय सांगावं. म्हण आहेना ! आधीं वाईट कर्म करूं नये. केलं तर त्याची खंती बाळगूं नये. खंती वाटत असली तरी त्याची वाच्यता करूं नये.

**आवडा**—कां बरं ? मी काय वाईट कर्म केलं आहे ? ज्यानं केलं असेल त्याला त्याची खंती. करील तो भरील. बरं पण घरांत चला. बाहेर कां ? आंत बसून बोलूं. ( घरांत गेल्यावर ) बसा.

**बजर०**—आपलंच घर आहे. इथें काय कमी आहे. स्वस्थ बसावं. ( बसतो. ) तुम्ही बसा.

**आवडा**—सगुणे, तें थोरलं दार घट्ट लाव पाहूं ? कायहो, नीच माणसं नेहमींच विजयी होतात का ?

बजर०–दुसऱ्याचा खून करतांना स्वतःच्या पोटाची खळगी भरण्याचा जसा उत्तम हेतु खुनी मनुष्याच्या अंतःकरणांत असतो तसाच आपण सांपडलों असतां सूळावर चढावं लागेल हीही गोष्ट तो विसरलेला नसतो.

आवडा–काय वाटेल तें असो. आज तुम्हीं पक्केपणीं माझ्या तावडींत सांपडलां आहांत. आतां तुम्हीं इथून सुटून जाणं अगदीं अशक्य आहे.

बजर०–जसं नशीबीं लिहिलं असेल तसं झालंच पाहिजे.

आवडा–ह्यावेळीं तुझ्या नशीबाची तुला पक्की पारख करतां येणार आहे.

बजर०–नवरी ठरल्यावर–घोडापालखीची तयारी केली तर तें शोभतं. वऱ्हाड्यांची यादि अगोदरच करण्यांत अर्थ काय ?

आवडा–कोंबडीचं अंडं आपल्या लहानशा बिळांत न्यायला उंदराला जितकं सोपं जातं तितकंच ह्या मोठ्या घरांतून निसटून जायला तुला कठीण जाणार आहे.

बजर०–परमेश्वर साह्य असल्यावर कठिण काय आहे ?

आवडा–कोल्हा मोठा शहाणा असतो पण त्याला पकडणारा त्याच्यापेक्षां हुषार असतो.

बजर०–दुर्दैवाचा अनुभव घेतल्याशिवाय दूरदर्शीपणा कोणाच्याच अंगीं येत नाहीं.

आवडा–आतां हवे तितके मनांत मांडे खा. तुझं नशीब माझ्या हातीं आहे. तूं आतां पुरा माझ्या जाळ्यांत सांपडला आहेस.

बजर०–थांब–जरा धीर धर. नवऱ्या मुलावर अक्षता टाकायला जितके लोक जमतात तितके सगळे कांहीं त्याच्याबरोबर पुरयाला जमत नाहींत.

**आवडा**—मेघांच्या गडगडाटानंतर वादळ होतं अन् मग पाऊस पडतो.

**बजर०**—मोठा मासा लहान माशाला गट्ट करतो.

**आवडा**—आजपर्यंत माझ्याशीं तूं जितक्या लुच्चेगिऱ्या केल्या आहेस त्याचं प्रायश्चित्त तुला मी आतां लवकरच देणार आहें.

**बजर०**—बरोबरच आहे. सापाच्या नुसतं दांतांतच विष असतं; पण तें बायकांच्या सर्व देहांत असतं.

**आवडा**—ह्या वेळेला नऊ खंड पृथ्वी जरी मला कोणी देऊं केली तरी माझ्या हातून तुझी सुटका होणार नाहीं.

**बजर०**—हं—आटप तर मग! माझं काय करावं अशी तुझी इच्छा असेल तें कर एकदां झटपट!

**आवडा**—सगुणे, तुझ्या मैत्रिणी आल्या आहेत ना?

**सगुणा**—( येऊन ) हो आल्या आहेत.

**आवडा**—जा—त्या सगळ्यांना इकडे घेऊन ये. काल तुला दाखवलेलं तें पोतंही येतांना बरोबर घेऊन ये. ( सगुणा जाते. ) आजपर्यंत मीं जो तुझ्या संबंधाचा राग ह्या मनांत ठेवला होता, त्याचा शेवट आज करून—मी शांत होणार आहें. ( पांच सहा मैत्रिणींसह सगुणा पोतें घेऊन येते. )

**सगुणा**—ह्या आम्हीं आलों. हें घ्या पोतं. ( देते. )

**आवडा**—धरा ह्या मेल्याचे हात.

**बजर०**—कशाला—इतक्या बायका कशाला? माझ्या दोन्ही हातांत हात घालायला मला एकच बायको पुरे. इतक्या बायकांशीं कुणी लग्न करावं बुआ? आपली छाती धडधडते.

**आवडा**—तुला बायको हवी नाहीं का? घे—हें पोतं घे तुला बायको. आतां ह्याच्याशींच तुझं लग्न लावतें.

**बजर०**—पोत्याशीं नकोगं? ती पहा—ती मला आवडते. तिच्याशीं मी खुषीनं लग्न लावतों.

**आवडा**—अग, बघतां काय तुम्ही सगळ्याजणीं? घाला मेल्याला त्या पोत्यांत. ( सगळ्याजणी मिळून त्याला पोत्यांत घालतात. ) ठीक झालं. बांधा आतां पोत्याचं तोंड! ( तोंड बांधल्यावर ) सगुणे, तुझ्या यजमानाचा तो शिपायाची नोकरी करणारा भाऊ आतांशे रातपाळीवर असतो ना?

**सगुणा**—होय!

**आवडा**—त्याला इकडे धाडून दे. हें पोतं संध्याकाळीं नदींत फेंकून द्यायचं आहे. तोंपर्यंत त्याला त्याच्यावर पहारा करायला मी सांगणार आहें. ह्यांत काय आहे हें त्यालाच नव्हे तर दुसऱ्या कोणालाही कळूं देऊं नका.

**सगळ्या मुली**—आपल्या कानीं सात बाळ्या. खंडोबाच्या अरवळ्या. अगदीं अळीमिळी गोपचिळी.

**आवडा**—आज तुम्हीं सगळ्याजणींनीं माझी मोठी कामगिरी केली आहे. ह्याबद्दल तुम्हांला मी उद्यां बक्षीस देईन. पण हें पहा ही आजची गोष्ट कुठे बोलूं नका बरं? कारण—

( ब्राह्मण कन्या नव्हे॰ )

कर्म कराया प्राणी नच भी, वाटे परि त्याप्रती ॥
भीती कर्मफलाची अती ॥ ध्रु॰ ॥
रतिरंगाची निंद्य कृतीही घडते रात्रींच ती ॥
साक्ष तयाची ही संतती ॥ १ ॥
निसर्ग ऐसें जाणुनि आपण दिवसां केली कृती ॥
म्हणुनी मिटवा मुख संप्रती ॥ २ ॥
घोर अशीं किति कर्में घडती रात्रीं म्हणुनीच ती ॥
वदनां मिटि रवि कमलावती ॥ ३ ॥

( पडदा पडतो. )

अंक दुसरा समाप्त.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

( पंढरपूरकर ब्राह्मण रस्त्यावर येतो. )

ब्राह्मण--

फटका.

ऐक जगारे विनती माझी जन्म तुझा तूं विसरुं नको ॥
मत्सरराखा कलहायुध तूं होउनि देशा बुडवुं नको ॥
स्वत्वा विकुनी मोबदल्याला गुलामगिरि ती घेउं नको ॥
स्वार्थ साधण्या पुढच्या पिढिला इनाम ऐसें ठेवुं नको ॥
मेघजलाच्या नजराण्यासह भूमाता तूं दवडुं नको ॥
विधर्मि पतिच्या करपाशामधिं शालिनशीला रडवुं नको ॥
॥ चाल ॥ देशकीर्तिला मळवुं नको ॥ परावलंबी होउं नको ॥
स्वधर्म विसरुनि घसरुं नको ॥ चाल ॥
परावलंबी यंत्रामध्यें देशहिताला गाळुं नको ॥ ध्रु० ॥
पूर्वज भोळे फसले म्हणती ' पारतंत्र्य तें नको नको ' ॥
म्हणुनी सोडी मगरमिठी ती नेत्रझांकणी करूं नको ॥
क्षुत्क्षामाचें चित्र पहा हें देशप्रीति सोडुं नको ॥
मातागृह जें दुष्काळाचें पारतंत्र्य, त्या कवळुं नको ॥ ध्रु० ॥

—हर हर! पांडुरंगा—पंढरीशा, कोण ही आमची भयंकर स्थिति! आवर्षणानं नदीनाले सुकून गेले असतां, त्यांचे स्वच्छंदानं विहार करण्याचे रस्ते जसे काळेठिक्कर—निर्जल दिसतात, तसेच हे आमचे क्षुधेच्या तापानं देह करपून गेले आहेत. आतां आम्ही काय करावं! असे हाल होण्यापेक्षां मरण बरं. हाच आमचा राजा, जर आज आमच्या धर्माचा असता तर त्यानं आमच्या-

साठीं खास कांहीं तरी तोड काढली असती. दुष्काळनिवारणार्थ त्यानं कांहीं मदत केली म्हणतात, पण मुजूमदारासारख्याच्या भुकेपुढें आम्हांला त्यांतून काय मिळणार? पंतांनीं तरी आम्हांला किती मदत करावी. (पाहून) हें कोण बरं इकडे येताहे? आहाहा! तोच हा थोर पुरुष! पांडुरंगाचा खरा भक्त! खरा दीनदयाळ! ( **दामाजीपंत** येतो. ब्राह्मण त्याला नमस्कार घालतो. )

**दामाजी**–अहो भटजीमहाराज़, उठा! हें काय हें! नुसत्या ब्राह्मण्याचा पोकळ डौल मिरवणाऱ्यांपेक्षां तुमच्यासारखे कर्मठ ब्राह्मणच श्रेष्ठ आहेत. माझ्या पायां पडण्याचं कारण काय? तुम्ही असे खिन्न कां? प्राप्त झालेल्या स्थितींत आनंदानं राहाणं जरी सर्वांनाच कळत नाहीं तरी तें कळवून घेण्याचा प्रयत्न करणं चांगलं.

**ब्राह्मण**–आपण म्हणतां त्याप्रमाणें वस्तुस्थिति आहे खरी; तरी पण हें पोट खपाटीला जाऊन त्यावर कुटुंबांतलीं माणसं ढोलकीं वाजवूं लागलीं म्हणजे जी दुष्काळाची वरात दुमदुमूं लागते तिचं वर्णन काय करावं! ह्या चेहेऱ्यांनीं यमराजाच्या काळ्या पताकीचा आश्रय धरला म्हणजे ह्या खोल बरगड्या आणि खप्पड गाल दुष्काळाच्या भांडारखान्याच्या मोठाल्या धर्मशाळा स्थापन झालेल्या दिसतात. हातांपायांत ताकत न राहिल्यामुळें ते यजमानाच्या मगरूर आणि आळशी चाकरांचा धडा गिरवतात. एकंदर देहाचं जर—

**दामाजी**–अहो द्विजश्रेष्ठ, मी हें सगळं ओळखतों. माझ्याकडून जी कांहीं जगाची सेवा घडणं शक्य आहे ती मी करीत आहें. ते त्या पलीकडल्या रानमाळांत जमलेले लोक पाहून–

(अभाग्याच्या घरीं.)

देह तयांचे सजीव परि ते प्रकांड मज गमती ॥
आशापल्लवि गळुनि तयांची, देह कृष्ण दिसती ॥ ध्रु० ॥
पोटाकरितां दोष देति ते जगकारककंदा ॥
सहज पसरिती तन्मुखकमलें ईशनामगंधा ॥
विरोधभक्ति ऐकुनि चढला प्रभु तो आनंदा ॥ चाल ॥
विश्वंभर तो तुष्ट जाहला आज तुम्हांवरती ॥ ध्रु० ॥

**ब्राह्मण**–खरं आहे. विश्वंभर आम्हांला खराच आज प्रसन्न झाला आहे. भिक्षेसाठीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत दारोदार तोंड वेंगाडलं तरी मूठभर दाणे सुद्धां मिळत नाहींत. बायकापोरं तडफडून प्राण देण्याच्या घाईत आलीं आहेत. माझीही बहुतेक तीच वाट लागणार असं दिसतं. असं असतां देवाची प्रसन्नता ती आणखी कोणची पाहिजे?

**दामाजी**–आठ दिवसांपूर्वींच तुम्हीं दोन बैल दाणे इथून नेलेतना?

**ब्राह्मण**–आपल्या घरीं अन्नदान, धान्यदान, द्रव्यदान–एकसारखं सुरू आहे, असं पंढरपूरच्या ग्रामस्थांनीं आधींच ऐकलं होतं. त्यामुळें ते सर्व ग्रामस्थ पंढरपूर सोडून, धाय मोकलीत, मंगळवेढ्याकडे यायला निघाले होते. माझी त्यांची वाटेंत गांठ पडली. माझे दोन्ही बैल त्यांनीं लुटले.

**दामाजी**–लुटूंद्या! पण त्यांचीं त्या वेळेपुरतीं तरी पोटं भरलींना?

**ब्राह्मण**–टोळधाडीनं ढेकर दिलीका? असा प्रश्न विचारण्यापैकींच हें आहे. माझे बैल लुटल्यावर, मी पुन्हां आपल्याकडे यायला जसा माघारा फिरलों, तसे तेही लाखो लोक माझ्यामागें येऊन त्या माळावर उतरले आहेत.

**दामाजी**–आपण काळजी करूं नका! मी आपणां सर्वांच्या पोटाची व्यवस्था लावतों. पांडुरंगाच्या घरीं कमी काय आहे?

**ब्राह्मण**–अहो, ह्या प्रसंगीं स्वराज्य नाहीं म्हणून सर्वच कमी आहे! आम्हीं कोणापाशीं दाद मागावी? आपण ह्या मंगळवेढ्याचे ठाणेदार आहांत. पंढरपूरचा एक मुसलमान ठाणेदार आहे. आपण आमच्या धर्माचे आहांत म्हणून आम्हांला जगवावं अशी आपली इच्छा होते. तो मुसलमान अधिकारी आम्हांला कशाला विचारतो आहे? एवढ्याच करतां स्वराज्य हवं!

**दामाजी**–स्वराज्यांत असे दुष्काळाचे वारंवार प्रसंग कधींच येत नाहींत. मी तुम्हांला खास सांगतों कीं, हा दुष्काळ ही दुर्गादेवीची वृद्धावस्थाच आहे! स्वराज्य पाहिजे, स्वराज्य पाहिजे–म्हणून परकीय अमलाखालीं त्रस्त झालेल्या प्रजेचे उष्ण श्वास ह्या आकाशांत मेघमंडळ उत्पन्न करूं लागले म्हणजे धर्मग्लानीचं निवारण करणारा पांडुरंग ह्या भूमंडळावर अवतार घेऊन येणार असं खास समजावं.

**ब्राह्मण**–परमेश्वरा, पंतांचे हे शब्द खरे करण्याकरतां धांव आतां. आमच्या सुखाकरतां, मृत्युलोकच्या वस्तीप्रमाणें–तुला नऊ महिने गर्भवास सोसावा लागतो–

**दामाजी**–तरी पण त्याचं त्याला काय? आत्म्याला दुःखभोग किंवा सुखोपभोग बिलकुल नाहींत. मृत्युलोकचं त्याचं काम संपलं म्हणजे जीर्णवस्त्राप्रमाणें तो ह्या देहाला टाकून चालता होतो. आपल्या मनासह शरीराला सुखदुःखांत तोच गुंगवतो. म्हणून त्याच चिच्छक्तीला आपण अनन्यभावानं शरण गेलं पाहिजे. तुम्हां सर्वांचे प्राण वांचवायची युक्ति तरी त्यानंच माझ्या हृदयांत उत्पन्न केली आहे. जा तुम्ही. तुमच्याबरोबर आलेल्या त्या सर्व लोकांसह ह्या गांवांत

शिरा. प्रजेला कोणच्याही तऱ्हेचा त्रास न देतां–सरकारी धान्याचीं कोठारं लुटून फस्त करा–आणि आपले जीव वांचवून स्वगृहीं आनंदानं जा! पुढें काय होईल त्याचा जबाबदार मी आहें.

**ब्राह्मण**–महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणें करतों; कारण जीव हा सर्वांपेक्षां प्यारा आहे. त्याला वांचवण्याकरतां घातपातादि धर्मबाह्य कृत्यांप्रमाणें वाटेल तें करायला तयार व्हावं लागतं हें कांहीं मोठं आश्चर्य नाहीं. शिवाय, आपण आम्हांला जीं धान्याचीं कोठारं लुटायची आज्ञा केली–तीं कोठारं तरी खरं पाह्यलं असतां, आम्हां प्रजाजनांच्याच धान्यावर सांठवलेलीं आहेत. आमच्या अन्नान्नदशेंत जर आम्हांला तीं उपयोगीं पडूं नयेत, तर काय, नेहमीं चैनींत गुंग होऊन, आम्हांला उपाशी मारणाऱ्या आमच्या सध्यांच्या बादशहाच्या परधर्मीय जातभाईकरतां तीं उपयोगी पडावींत? ठाणेदारसाहेब, आपण योजलेली युक्ति फार उत्तम आहे. ह्यांत राजद्रोह जरी होतो आहे तरी पांडुरंग आपला पाठीराखा खास होईल. (जातो.)

**दामाजी**–पांडुरंगा, माझे धर्मबंधु ह्या दुष्काळानं पटापट मृत्युमुखीं पडलेले ह्या डोळ्यांनीं बघण्यापेक्षां ते अशा तऱ्हेनं वांचलेले तुला आवडणार नाहींत काय? आर्यधर्मांतलीं मोठालीं कुळं ह्या दुष्काळांत जर नामशेष होऊं लागलीं तर विठ्ठला, तुझा वैदिक धर्म रक्षण करण्याची काळजी तुलाच आहे. अनाथ प्रजेकडून सरकारी धान्याची कोठारं मी आज लुटवीत आहें–हा महाघोर राजद्रोह होत आहे–हें मला कळतं; पण तसं करण्याची स्फूर्ति तूंच–पांडुरंगा–माझ्या मनांत उत्पन्न केलीस त्याला मी काय करणार? ही बातमी बादशहा हुमायुनशहा ब्राह्मणीला कळल्यावर तो ह्या देहाचे हालहाल करील; पण लाखो देहांचे

हाल होण्यापेक्षां ह्या एका देहाच्या हालांची ती बिशाद काय ? म्हणून म्हणतों पांडुरंगा–

लावणी.

दुष्ट काळ हा कष्ट देतसे सुष्ट प्रजा छळुनी ॥
तुष्ट करी ती स्पष्टपणें तूं इष्ट कृपा करुनी ॥ ध्रु० ॥
शिष्ट कुळें किति नष्ट होति तीं क्लिष्टपणा वरुनी ॥
पुष्ट काळ हा पिष्ट करीरे धष्टपणा धरुनी ॥
सृष्ट धर्म तव राष्ट्रपार तो भूपृष्ठावरुनी ॥
नष्ट होतसे खष्टांहातीं अष्ट दिशांकडुनी ॥ ध्रु० ॥

–हे सर्व प्रजाजन आज पांडुरंगाच्या कृपेनं संतुष्ट होणार आहेत; हें पाहून, मला माझ्या राजद्रोहाबद्दल मिळणारी भावी शिक्षा– ह्या अन्नसंतर्पणाचा आशीर्वादच मिळणार आहे. (मुजुमदार येतो.)

**मुजूमदार**–ह्यावेळीं प्रजेचं संरक्षण करण्याची पंतांनीं मोठी नामी युक्ति काढली. पण ह्याबद्दल बादशहाला राग येऊन तो काय करील कोण जाणें.

**दामाजी**–प्राण घेण्यापेक्षां अधिक काय करणार ?

**मुजूमदार**–तें तर ठरलंच. पण ह्यांतून पार पडण्याची युक्ति केली तर ?

**दामाजी**–युक्त्या योजणं, खोट्याचं खरं आणि खऱ्याचं खोटं करणं–ह्या गोष्टींची आपल्याला जरूर नाहीं. ज्याला साधतील त्यानं त्या कराव्या आणि तशाच भराव्या ! आमचा भार सर्व पांडुरंगावर आहे.

**मुजूमदार**–आपला भार सर्व पांडुरंगावर आहे ही एक गोष्ट त्यांतल्या त्यांत चांगलीच आहे. बरं चलायचंना घरीं ?

**दामाजी**–चला–मी आलोंच.

**मुजूमदार**–( जातांना ) आतां ह्याचा पांडुरंग ह्याचं रक्षण करतो कीं माझा शंकर ह्याचा संहार करतो हें बघायचं आहे.

ह्या दामाजीच्या विरुद्ध प्रथम आतां आमचं पत्र आणि नंतर स्वतः बादशहाकडे ही स्वारी जाणार. मग दाखवतों, काय चमत्कार आहे ह्या मुजूमदाराच्या अकलेचा तो! ( जातो. )

**दामाजी**—ह्या मुजूमदाराला मी पक्का ओळखून आहें. प्रेताच्या टाळूवरचं लोणी खाणारे पुष्कळ मिळतील; परंतु सूड उगविण्याकरतां प्रेताचा गळा कापून धन्यता मानणारा मात्र ह्याच्यासारखा हाच एक. असो. आपल्याला काय? ज्याचं कर्म त्याला.

( दुष्काळग्रस्तलोक येतात. )

**दुष्काळग्रस्तलोक**——

( फरमावो शरमावो० )

**रविकांत जैसा धरणीला ह्या अस्तित्वा देतो ॥**
**दामाजी तैं आम्हां होई म्हणुनि सुखदा तो ॥**
**सत्कीर्ति ॥ संपत्ती ॥ सुखशांती ॥ संतति ती ॥**
**देउ त्याला कर्णयशाला पात्र जहाला तो ॥ ध्रु० ॥**
**राजद्रोहामधुनी याला काढण्यास ये तो ॥**
**भक्तांचा ॥ कैवारी ॥ गोकुळिंचा ॥ गोवारी ॥**
**देउ याला दुष्टां मर्दुनि विमल यशाला तो ॥ ध्रु० ॥**

**दामाजी**—आपण सर्व संतुष्ट झालांत हें पाहून मला आनंद होतो आहे. राजानं नेमलेल्या अधिकाऱ्यांनीं प्रजेच्या सुखाकडे जर नजर दिली नाहीं तर त्यांचे शाप राजाला बाधतात. प्रजेचं अकल्याण व्हावं अशी राजाची इच्छा नसते; परंतु अधिकाऱ्यांच्या लबाडीनं प्रजा राजावर नाखूष होते. राजा त्याला काय करणार? प्रत्येक अधिकारी जर आपली जबाबदारी ओळखून प्रजेचं प्रेम संपादील तर राजा विधर्मी असो अथवा स्वधर्मी असो—प्रजेला त्याच्यावर नाखूष होण्याला कारणच राहाणार नाहीं. साप जात्त्या विषारी आहे; परंतु त्याला कोणी डिवचल्याशिवाय तो कोणाला दंश करीत नाहीं. तो

चावतो तें तरी फक्त स्वसंरक्षणाकरतांच. ठार मारावं म्हणून नव्हे. हीच गोष्ट अधिकाऱ्यांची आहे. दुष्टप्रजा ताळ्यावर आणण्याकरतां अधिकारविषाचा उपयोग केला पाहिजे. लायकी पाहूनच राजा अधिकार देतो. म्हणून अधिकाऱ्यांनीं--

साकी.

**मत्सर हेवा स्वार्थ सोडुनी उदारबुद्धी व्हावें ॥**
**देशकार्य तें करण्यालागीं धर्मराजयश घ्यावें ॥**
**यदुपति पद ध्यावें ॥ गीतावचन आठवावें ॥ १ ॥**

(पडदा पडतो.)

## प्रवेश दुसरा.

[ पोत्यांत **बजरबट्टू** असून एक **शिपाई** पहाऱ्यावर उभा आहे असा खोलीचा पडदा उघडतो.]

**बजर०**–(पोत्यांतून) दुर्दैवा, तूं रावापासून रंकापर्यंत सर्वांच्यांच पाठीस कां लागलं आहेस ? माझ्या बापाच्या संपत्तीनं तर माझे नुसते धिंडवडे मांडले आहेत. धिःकार असो त्या संपत्तीला! माझ्या बापानं माझ्या करतां एक कपर्दीकही ठेवली नसती तरी कांहीं हरकत नव्हती! द्रव्यामुळेंच माझी ही अशी दुस्थिति झाली आहे. मी दरिद्री आहें असं जगाला दाखवण्याकरतां नेहमीं वाईट कपडे वापरीत होतों; पण अखेर माझी श्रीमंती माझ्या गुप्तद्रव्यानं फोडलीच. ह्या द्रव्यलोभी स्त्रीनं माझी संपत्ती उपटण्याकरतां मला पकडून माझ्याशीं आतां तिनं एका स्त्रीची मैत्री करण्याचा घाट घातला आहे काय ? ठीक आहे! काय वाटेल तें होवो! मी कधींही आपला पवित्र हात तिच्या हातांत घालून लग्नासारख्या गोष्टींत विटाळून घेणार

नाहीं. ह्या आवडाजीनं जर तसं हट्टानंच घडवून आणलं तर पुढें काय करायचं हें मला ठाऊक आहे.

**शिपाई**–ह्याचा अर्थ काय बुवा! असलं हें भाषण आणि दुःखाचे सुस्कारे ह्या पोत्यांतून काय म्हणून येताहेत? कोण आहे आंत? बोल? तुला ह्या पोत्यांत कां ठेवलं आहे? तूं कोण आहेस?

**बजर०**–बाबा, मी कुणीका असेना! तुला काय करायचं आहे? तूं कुणीही ऐस! तुझं काम तूं कर. माझी हकीकत जरी तूं ऐकलीस तरी माझं दुर्दैव मलाच भोगलं पाहिजे.

**शिपाई**–मी जरी गरीब शिपाई आहें तरी मनुष्य आहें. मनुष्यपणाला अनुसरूनच मला वर्तन केलं पाहिजे. मनुष्यानं मनुष्यपणा राखण्याकरतां आपल्या कोटींतल्या प्राण्यावर दया केलीच पाहिजे. म्हणून, तुझ्या दुर्दैवांतून तुझी मुक्तता करण्याची खटपट करणं हें माझं काम आहे असं मी समजतों. सध्यांच्या तुझ्या स्थितींतून तुझी सुटका जरी माझ्या हातून झाली नाहीं तरी तुझ्या दुःखी स्थितींत मला तुझ्या शांतवनाचे चार शब्द बोललेच पाहिजेत.

**बजर०**–काय, माझं शांतवन! छेः छेः! तुम्ही किंवा दुसरा कोणी माझं शांतवन काय करणार! जें माझं दुर्दैव मला भयंकर अशा संकटांत ढकलणार आहे त्याला कोण प्रतिबंध करणार?

**शिपाई**–तुमचं दुर्दैव तुम्हांला फटके का देणार आहे?

**बजर०**–छेः!

**शिपाई**–मग काय, सुळावर चढवणार आहे?

**बजर०**–छे हो! त्यापेक्षांही वाईट करणार आहे.

**शिपाई**–प्राण घेण्यापेक्षां तुमचं आणखीं वाईट ते तें काय करणार?

बजर०—लग्न–लग्न–लग्न!

शिपाई—हः हः हः हः हः! लग्नाला तुम्हीं दुर्दैव समजतां? मोठं आश्चर्य आहे बुवा? मला वाटलं होतं कीं, तें दुर्दैव तुमचे मोठे हाल करणार आहे! अहो लग्नासारख्या मंगल गोष्टीला अमंगल समजून तुम्हीं कष्टी होतां ह्याला काय म्हणावं!

बजर०—लग्न करणं ही दुर्दैवाची गोष्ट नाहीं. परंतु ह्या घरच्या धनीणीनं जिच्याशीं माझं लग्न लावायचं ज्या तऱ्हेनं ठरवलं आहे त्या तऱ्हेला मी माझं दुर्दैव समजतों.

शिपाई—अशी कोणची चमत्कारिक तऱ्हा आहे ती?

बजर०—इथें आपणां दोघांशिवाय तिसरं कुणी नाहींना? हो—नाहीं तर सगळंच मुसळ केरांत जायचं!

शिपाई—इथें तिसरं कोणी नाहीं. बोला लवकर काय तें!

बजर०—पण तुम्हीं सुद्धां, मी सांगेन तें कुठें न फोडण्याबद्दल शपथ घेतली पाहिजे; उजव्या कानानं ऐकलेली गोष्ट डाव्या कानाला कळतां उपयोगी नाहीं.

शिपाई—त्याबद्दल काळजी नको. मी वचनाचा सच्चा असल्याबद्दल माझा मला अभिमान आहे.

बजर०—ठीक आहे! तुमच्या खरेपणाची खात्री ह्यापेक्षां जास्त नको! पण लक्षांत ठेवा! भिंतीला कान असतात अशी एक म्हण आहे! पण खरं पाह्यलं असतां ही गोष्ट गुप्त ठेवून तरी होणार काय? जें घडायचं ठरलं तें घडलंच पाहिजे. भवितव्यता बलीयसी!

शिपाई—सांगा तर मग मला सगळी हकीकत?

बजर०—माझ्या विचित्र देहाच्या चमत्कारिक आकारावरून आणि रहाणीवरून मी दरिद्री आहें असा जो आजपर्यंत भास होत होता तो भ्रमाचा भोंपळा फुटून माझी श्रीमंती बाहेर

पडली हें मीं तुम्हांला आधीं सांगितलं पाहिजे. माझ्या त्या संपत्तीचा मी एकटाच वारस आजपर्यंत होतों; परंतु आतां त्या संपत्तीला एक नवी नवरी मालकीण होऊं पहाते आहे. माझ्या घराकडे मला तिचा त्रास होऊं लागला म्हणून मी हिकडे पळून आलें. पण तिच्या बापानं मला अखेर सोधून काढलाच. तो मोठा सज्जन पुरुष आहे.

**शिपाई**–त्याच्या सारखीच त्याची मुलगी–नव्हे–तुमच्या संपत्तीची भावी मालकीण मोठी चांगली असेल तर?

**बजर०**–हें काय विचारावं? तिच्या कांतीचं वर्णन करायचं म्हणजे ती शुक्राच्या चांदणीसारखी चमचमणारी आहे असं म्हटलं तर कांहीं अगदींच अतिशयोक्ति होणार नाहीं.

**शिपाई**–असं आहे तर अशा चांदणीला नको म्हणणारा माणूस मूर्खच नव्हेका?

**बजर०**–अहो हें सगळं माझ्या देहावर अवलंबून आहे! माझा विचित्र स्वभाव आणि चमत्कारिक देह त्या सुंदरीला काय पसंत होणार? माझी संपत्ती उपटण्याकरतांच त्या थेरड्यानं–तिच्या बापानं–हा व्यूह रचला आहे.

**शिपाई**–एकंदरींत आपण संपत्तीवान आहांत म्हणायचे?

**बजर०**–हो–देवाच्या दयेनं मी श्रीमंतींत बऱ्याच वरच्या पायरीवर बसेन.

**शिपाई** आपलं वार्षिक उत्पन्न कुठपर्यंत आहे?

**बजर०**–सुमार एक लाखाचं आहे.

**शिपाई**–आणि आपल्या भावी श्वशुरांचं?

**बजर०**–सुमार दहा हजारांचं!

**शिपाई**–तेही कांहीं गरीब नाहींत म्हणायचे तर मग?

**बजर०**–छेः छेः! त्यांच्या घरीं गरीबीचं नांवच नाहीं.

**शिपाई**–लग्नाचा हुंडाबिंडा कांहींच कां नाहीं तर मग तो देणार ?

**बजर०**–हो हो ! दोन चार हजार रुपये द्यायला ते तयार आहेत. तें सगळं मी आतां तुम्हांला सावकाश सांगतों. पण माझा जीवकनी फारच गुदमरला आहे ? पोत्याचं तोंड जर कांहीं वेळ सोडाल तर मोकळेपणानं मी सगळी हकीकत तुम्हाला सांगेन. ती ऐकल्यावर पोत्याचं पुन्हा तोंड बांधून ठेवा म्हणजे झालं.

**शिपाई**–ठीक आहे. ( सोडतो.) काढा आतां आपलं तोंड बाहेर ! सांगा सगळी हकीकत ! अरे पण हें काय ? किती हा चमत्कारिक पुतळा ! तुमचं तोंड जर इतकं चमत्कारिक आहे तर बाकीचा देह कसा असेल ?

**बजर०**–मला पुरता पोत्याबाहेर येऊंद्या म्हणजे तें स्वरूप दृष्टीस पडेल.

**शिपाई**–पण मीं तें बघितल्यावर तुम्हांला पुन्हां आंत जाऊन बसलं पाहिजे.

**बजर०**–त्याबद्दलची तुम्हीं काळजीच सोडा ! बिलकुल शंका घेऊं नका.

**शिपाई**–या तर बाहेर.

**बजर०**–( पोत्याच्या बाहेर येऊन ) हा आलों पहा ! मी कसा काय आहें ?

**शिपाई**–छे बुवा ! आपण असा प्राणी आजपर्यंत कधीं पाह्यल्याचं आठवत नाहीं.

**बजर०**–नाहींच पाह्यला कधीं. आणि मला त्या नवऱ्यामुलीनं लग्न लागायच्या आधीं उजेडांत बघूं नये म्हणून तर ह्या पोत्यांत मला कोंडला आहे. तिचा बाप तिला ह्या घरीं उद्यां आणून त्या पलीकडच्या खोलींत अंधेरांत माझी तिला बायको

करणार आहे. त्याचवेळीं मला हुंडा मिळेल. पण तें सर्व व्यर्थ आहे.

**शिपाई**–कितीहो तुम्हीं चमत्कारिक आहां? खरोखर अशी संपत्ती आणि तशी ती सुंदर बायको कोण नको म्हणेल?

**बजर०**–मी म्हणतों नको म्हणून.

**शिपाई**–तुम्हीं मूर्ख आहांत. पण यांत विशेष कांहीं नाहीं. दैवाची गति अशीच चमत्कारिक आहे. सुंदर स्त्रीला कुरूप नवरा आणि कुरूप स्त्रीला सुंदर पती–अशी जोडपीं शेंकडा नव्याण्णव दिसतात. तशा स्थितींत नवऱ्याला बायको आवडत नाहीं आणि बायकोला नवरा आवडत नाहीं. मिळून सगळाच फजीतवाडा.

**बजर०**–तुम्हीं म्हणतां तें खरं. पण कुरूप माणसाला आपण कुरूप आहोंत असं वाटेल तेव्हां ह्या तुमच्या बोलण्याचा अर्थ बरोबर लक्षांत येईल.

**शिपाई**–खरं आहे. फार कशाला? माझ्याकडेच पहा? मी अद्याप अविवाहित आहें. बरं रूपानं म्हटलं तर तुमच्या-पेक्षां कितीपट तरी सुरेख आहें.

**बजर०**–तुमचं म्हणणं खरं आहे. तुम्हांला आपण सुखी व्हावं असं वाटणंही अगदीं रास्त आहे. पण त्यांत काय आहे? इच्छा असेल तर बोला. चार घटकांच्या आंत तुम्हांला जन्माचे सुखी करून टाकतों.

**शिपाई**–तें कसं काय?

**बजर०**–त्या स्त्रीशीं लग्न न करण्याचा मी अगदीं पक्का निश्चय केला आहे. ती अती म्हणजे अतीच रूपवती आहे. आणि माझी खात्री आहे, कीं मी तिला खचित आवडणार नाहीं. त्यामुळें ती माझी एकट्याच्या मालकीची कशी राहील? ती

सद्गुणांची खाणच आहे तेव्हां असं वाईट कर्म तिच्या हातूंन व्हायचं नाहीं म्हणा! पण नको. म्हणून म्हणतों–तुम्ही सुरेख–चांगले नीट नेटस आहांत. माझ्या जागीं नेमणूक करून घ्यायची असेल तर पहा! माझा स्वभावच असा आहे. आपल्याला नको तर दुसऱ्यानंही तें पत्करूं नये असं मी कधीं म्हणणार नाहीं. असेल कबूल तर बसा पोत्यांत.

**शिपाई**–शाबास! मेहेरबान्, चांगली युक्ति काढलीत! जागच्या जागीं ठार होण्याची युक्ति फार नामी सांगितलीत बुवा?

**बजर०**–छेः तुम्हीं अगदींच चुकतां! पुरता लग्नविधी झाल्याशिवाय तुम्हांला पोत्याच्या बाहेर काढणार कोण? दुसरी गोष्ट–लग्नविधी उरकल्यावर तुम्हांला बाहेर काढण्यांत येईल. पुढें तुमच्यासारखा सुंदर, ऐटबाज पुरूष ती नवरी नाकारील असं कोणी तरी म्हणेल काय? माझ्यापेक्षां तुम्हीं जर त्या सुंदरीचे पति व्हाल तर खरोखर देवच तिला पावला असं मी समजेन.

**शिपाई**–बरं तुम्ही म्हणतां तसं न होतां तिनं मला नाकारला तर पलागती मार खावा लागेल, त्याचं कसं काय?

**बजर०**–अगदीं झूट. जो एकदां लग्नविधीनं जावई ठरला त्याला मारायची कोणाची छाती आहे? त्यांत त्यांचाच दुर्लौकिक होणार आहे.

**शिपाई**–हो हो! तुम्हीं म्हणतां हें जमतं खरं.

**बजर०**–अहो इतकंच काय? त्या म्हाताऱ्याला पोरना बाळ. एकुलती एक मुलगी. पुढें त्याच्या दौलतीचे वारस तुम्हींच होणार आहां. मग तुमच्या सुखाला काय पाड!

**शिपाई**–छेः! असले मनचे मांडे मनांतच ठेवावे हें बरं.

हें काम फार सोपं आहे असं तुम्हाला वाटतं. पण आपला धीर होत नाहीं. सगळ्यापेक्षां माझा प्राण मला प्रिय आहे.

**बजर०**–राम, राम, राम! अगदींच कींहो तुम्ही वेडे! शिपायाची नोकरी करतां आणि असे भागुबाईसारखे भितां? जरा असे धीट व्हा! द्या त्या भित्रेपणाला सोडून. तुमच्याशीं लग्न लागल्यानंतर ती सुंदर पुतळी–ती सद्गुणांची मूर्ति–तुमची भावी स्त्री–तुम्हांला झिडकारील म्हणतां? केवढा हा तुमचा अजागळपणा? जा–त्या पोत्यांत बसा आणि चार घटकांनीं सुखी व्हा! भ्यायचं काय कारण! अशी संधि आधीं येत नाहीं. आली तर ती दवडतां उपयोगी नाहीं. प्रारब्ध एकदांच आयुष्यांत उघडत असतं. चला–जा–त्या पोत्यांत बसा! हातांत येणाऱ्या चिंतामणीला कांच समजूं नका.

**शिपाई**–भावी सौख्याच्या तुम्हीं फुलवून सांगितलेल्या गोष्टींनीं माझं मन वळलं खरं. जो लढणारच नाहीं तो पडेल कसा? आयतं पंचपक्वान्नांचं ताट वाढून आलं आहे. मी तें स्वीकारणार.

**बजर**–शाबास! ह्याचं नांव छाती! मग जा तर मग आतां लवकर त्या पोत्यांत बसा.

**शिपाई**–पण जरा विचार करतों.

**बजर**–पुरे करा आतां. हा मीच बसतों त्यांत जाऊन. तुम्हीं आपलं तोंड बंद करा म्हणजे झालं. तुमचं नशीबच शिपायाची नोकरी मरेपर्यंत करायचं आहे त्याला मी काय करणार? ताटांत जेव म्हटलं तर करटीच बरी, असं म्हणणारे तुम्ही.

**शिपाई**–तसं नव्हे हो. पण इतकी घाई कां?

बजर०–अहो–घटका भरत आल्यान् घाई कां म्हणजे? पण जाऊं दे. माझा बेत फिरला आतां. मीच तिच्याशीं लग्न लावणार. काय होईल तें होवो!

शिपाई–हें पहा, मनुष्यानं एकवचनी असावं हें बरं. माझ्या भावी सुखाच्या आड तुम्हीं येणं बरं नाहीं. हा पहा मी बसतों पोत्यांत. (पोत्यांत बसल्यावर) तोंड जरा बेतानंच आवळा बरं का?

बजर०–(पोतें बांधतांना) त्याबद्दल काळजी नको! पण तुम्हीं मात्र आतां अगदीं संभाळून असा अँ! प्रसंगाप्रमाणें वर्तन ठेवा! आपल्या पुण्यतिथीच्या घटका बहुतेक भरत आल्या आहेतच.

शिपाई–तुम्हीं पण आतां अगदीं ह्या बाबतींत गप्प बसा. लग्न होऊं द्या! मग सांगतों काय आहे तें!

बजर०–मित्रा, श्रीमंत झाल्यावर माझी ओळख विसरूं नको हो!

शिपाई–सध्यां तुम्ही गप्प बसा.

बजर०–ठीक आहे. (पाहून) अरे बापरे! ही आवडीच इकडे येत आहे. आतां कसं करावं. तें तिचं त्या खुंटीवरचं लुगडं नेसून घराच्या बाहेर पडावं म्हणजे झालं! शिपाईबोवा, येतों आतां. (जातो व आवडा येते.)

आवडा–कां कसं काय कोल्हेराव, निस्टून जायची अद्याप शक्कल काढण्याचे बेत सुरू आहेतना?

शिपाई–छेः छेः! तुम्ही हो म्हटलं कीं मी तयार आहें पत्क-रायला!

आवडा–तूं काय पत्करणार?

शिपाई–सगळी तयारी आहे कां पण?

आवडा–लवकरच तयारी होणार आहे बरं.

**शिपाई**–आटपा तर मग. मला अगदीं घाई झाली आहे.

**आवडा**–आतां कांहीं फार अवकाश नाहीं.

**शिपाई**–ती मंगळ घटका केव्हां येईल असं मला झालं आहे. आतां वेळ लावूं नका. लवकर तिचा माझा योग जमवून आणा.

**आवडा**–लवकरच योग जमवून आणतें. मग तर शांत होशीलना ?

**शिपाई**–दोन हजार रुपये हुंड्याची व्यवस्था केली आहेना ? ते नसतील तर आपण लग्न करणार नाहीं.

**आवडा**–हो हो ! सर्व कांहीं तयार आहे. तुला माहीत नाहीं असंच एक मोठं बक्षीस तुला मिळणार आहे. (पोत्याचं तोंड सोडून) हं चल ये बाहेर ! (शिपाई बाहेर आल्यावर) अग बाई, हें काय ? मी समजत होतें कीं, संध्याकाळ झाली तेव्हां तूं नोकरीवर गेला असशील ! ह्या पोत्यांत तुला बिचाऱ्याला कुणी घातला ?

**शिपाई**–कुणी म्हणजे ? त्या कुरूप माणसानं ह्या सुरूपाला आपल्या जागीं बसवून, त्या सुंदर तनुलतिकेचं पाणिग्रहण करायला मला सांगितलं आहे.

**आवडा**–कोणची ती तनुलतिका ? अरे शिपाया, तूं शुद्धीवर आहेसका ! जर असशील तर काय खरी हकीकत आहे ती सांग पाहूं ?

**शिपाई**–ह्या पोत्यांत ज्या विचित्र पुरुषाला तुम्हीं कोंडून ठेवून मला त्याच्यावर पहारा करायला सांगितलं होतं त्याचं जिच्याशीं लग्न लागायचं होतं ती सुंदरी–तिच्याशींच मी लग्न लावण्याच्या अटीवर ह्या पोत्यांतून त्याला काढून मी त्याच्या जागीं बसलों. असं असतां आतां तुम्हीं कुठची नवरी मुलगी म्हणून वेड पांघरतां हें ठीक नाहीं. एवढा मी आपला जीव गुदमरून घेतला तो फुकटचाच होय ? द्या मला बायको !

**आवडा**–अरे शिपाया, त्या लुच्चानं तुला कनी–पुरं ठकवलं! तुझ्यासारखे गोड थापांवर भुलणारे पुरूष स्त्रियांशीं लग्न लावून त्यांच्या जाळ्यांत अडकणं बरं नाहीं. व्यर्थ मरायचे. अग मुलींनो, ह्याला स्त्रियांचा महिमा सांगून ह्याची चांगली कान· उघाडणी करा.

**सर्व मुली**–

(घेउनि ये पंखा०)

षंढ खरा तूंरे । तुजलारे । बाइल ती कशा ॥ ध्रु० ॥
ठकविल ती तुजला । मारुनि रे मुरक्याला ॥
नाद कसा । सोड म्हशा ॥ बाइल० ॥
मूर्खचि तूं म्हणुनी । ठकलासी तद्वचनीं ।
म्हणुनिच ही । झालि दशा ॥ बाइल० ॥
खीवच पाडिलरे । संकटिं थोर अतीरे ॥
नारी त्या घोर अशा ॥ बाइल० ॥

**शिपाई**–हें तुमचं म्हणणं जर खरं असेल तर परमेश्वर त्या लुच्चाला बघून घेईल. मी जातों.

**आवडा**–जा बरं. लग्न करण्याच्या भानगडींत पुन्हां पडूं नको. ( शिपाई जातो. ) बरं पण आतां ह्या बजरबट्टूचं कसं काय करावं? त्याच्यावर मी जें बालंट घालून त्याला ह्या जगांतून गुप्तपणें नाहींसा करणार होतें तें तर फसलंच. आतां काय करावं! छेः दुसरी तोडच नाहीं. मनुष्यस्वभावाला अनुसरून त्याचा सूड तर पुरा घेतलाच पाहिजे. आपलं नाक कापून दुसऱ्याला अपशकून करण्यानंच स्त्रीचरित्राचा महिमा वाढतो. म्हणून—–

( दिल्दार यार छयेलासि० )

बेदरासि यांसि बांधोनि नेतें पहा मी ॥
जातें धरीतें राजा लगामी ॥ चाल ॥

राजा मोही होयी ऐशा गाना गायी ॥
नरकिं नीचां जाण्यास युक्तीस योजि मी ॥
घात माझा झाला सफाइ त्यांनीं केला ॥
दावि स्त्री बलास लुच्चांस कैसी पहा मी ॥ १ ॥

(जाते.)

## प्रवेश तिसरा.

[ घरांत सावित्री, पार्वती वगैरे स्त्रिया महालक्ष्मीच्या पुढें आरती करीत बसल्या आहेत.]

### महालक्ष्मीची आरती.

मंगळमूरती आरती उगवली माये ॥ सुफळ द्यावया सताउक्ष राया ॥ तिष्ठली राज्य करी ॥ आयूपण द्यावया ॥ आरती महालक्ष्मी ॥ वास काशीये पुरीं ॥ तुझी माये भक्ती करी ॥ रतनाचे दीवे माणीकांच्या वाति ॥ ओंवाळू मोत्यें ज्योती ॥ भावें करूं आरती ॥ ध्रु० ॥ नाहोनि माखोनि मोहनी बैसली ॥ सर्व अळंकार आंगीं ल्याएली ॥ पाटावाची चोळी हीरदुक नेसली ॥ आरती० ॥ आणारे माळ्यांनो जाइ जूईच्या कळ्या ॥ सोळा त्रिकुटी सोळा ऐशा दूरवा ॥ सोळा परीची पत्री जाई जूई अबई शेवंती ॥ नागचाफा पूजेजवळी आणीती ॥ आरती० ॥ साळीचे तांदूळ मूगांच्या डाळी ॥ आळण खीचडी नांदते नारी ॥ आपल्या पतीकारणें सेवा करीते भारी ॥ आरती० ॥ गौरीला नैवेद्य खाजीया करंजा ॥ साखरेचा पाक विस्तारी ताट ॥ दुरुनी दीसतां अंबामायेचें देऊळ ॥ कोणी बांधीली सोन्याची तूळ ॥ खांब हे तुळवट वर ठेवीली वीट ॥ आरती० ॥

( आरती संपल्यावर ऊद करून घागरी घेऊन देवीपुढें फुंकूं लागतात. इतक्यांत दामाजी एका बाजूनें येतो. )

दामाजी—अहाहा! हा ह्या मातीच्या घटांतून जो फूत्कार निघतो आहे तो एक प्रकारचा हरिनामस्मरणाचा घोषच चालला आहे असं वाटतं. ह्यावेळीं—

( बायानों, द्या सोडोनी० )

अढळ मना करुनी किति ह्या फुंकिति घट ललना कैशा ॥
न ठरे पद जागीं एका तांडव शिव करि ह्या तैशा ॥
सर्व अंग मुरडुनि दिसती नम्र अती रम्यहि ऐशा ॥ चाल ॥
वायू हलवी किसलय तें ॥ भक्ति डोलवी स्त्रीवपुतें ॥
मन कंकणनादें होतें ॥ जागृत किति संसारीं ह्या ॥
विठ्ठलपद भजनीं रमण्या ॥ गुंग स्त्रियांसम ह्या प्राण्यां ॥ १ ॥

प्राणीमात्रांचे देह ह्या मृत्तिकेच्या कुंभांप्रमाणेंच आहेत. ह्या देहरूप मडक्यांत वारा भरलेला आहे म्हणून हीं वारा भरलेल्या शिडांप्रमाणें डोलताहेत. ह्यांतला वारा निघून गेला म्हणजे तीं मडकीं आणि हीं एकच होणार! एखादा मनुष्य गुदमरून बेशुद्ध पडला असतां त्याला पूर्वस्थितीवर आणण्याकरतां त्याच्या तोंडांत जसा प्राणीजन्य वारा भरण्याचा प्रयत्न करतात त्याचप्रमाणें ह्या स्त्रिया त्या निर्जीव मडक्यांत वारा भरण्याचा तर प्रयत्न करीत नसतीलना? पण हें केवढं अज्ञान! कारण--

( भूपती खरें तें० )

निर्जीव सजिव हे भास मात्र स्वप्नींचे ॥
आहेत खेळ हे पूर्ण ईशवृत्तीचे ॥ धृ० ॥
चहुंकडे दिसत तें सर्वकाळ गमतीचें ॥
ह्या सत्य म्हणावें मोहपटल तें वाचें ॥
॥ चाल ॥ ईश्वरी शक्ति ही नाचे ॥ तिजसि हो ॥
वर्णना करुनि ब्रह्याचे ॥ शब्द हो ॥
संपले, कितिक वस्तीचे ॥ अम्हि हो ॥ चाल ॥
ह्या जगीं, क्षणिक हे देह मुळिंच स्वप्नींचे ॥
संबंध आमुचे मृन्घटासि बंधूंचे ॥ धृ० ॥

असं असतां एका आदिमायेनं ह्या अनेक स्त्रियांचीं रूपं धारण करून ह्या मातीच्या घागरींप्रमाणें सर्व जग आहे असं आम्हां

मर्त्यांनां स्पष्टपणें दाखवण्याची क्रिया इथें चालवली आहे असं दिसतं. ही क्रिया प्रत्यक्ष रुक्मिणीमाताच दाखवते आहे. म्हणून—

( स्फटिकांचे ते० )

**समज जगा हा मोहपसारा ॥ भुलुनी नच जा ह्या संसारा ॥ ध्रु० ॥ उलुका न दिसे दिनमणि असतां ॥ दोष न हा रविचा कीं सारा ॥ उमजुनि व्हावें विठ्ठलपदिं रत ॥ तेच पाय तारक सत्य गिरा ॥ ध्रु० ॥**

( **बजरबट्टू** घागर फुंकीत येतो. )

आहाहा! खरोखर, आज जगन्माता ह्या बजरबट्टूच्या तोंडून कांहीं तरी सत्यकथा वदवणार असं दिसतं! ( **बजरबट्टू** आपल्या हातांतील घागर टाकून देऊन जमीनीवर फुंकरा मारीत खुरमांड्या घालून बसतो व त्याला बायका प्रश्न विचारतात )

**पहिली स्त्री**–आई माते, बोल! माझा प्रश्न सांग.

**बजर०**–बोल.

**प० स्त्री**–माझ्या मुलाला मूल होत नाहीं. याचं कारण काय?

**बजर०**–तुझ्या सुनेला मेद वाढला आहे. मुलाला तालीम करायला सांग. सुनेला पिंपळाचा पार झिजवायला लाव.

**दु० स्त्री**–आमच्या घरीं दुखणं लागलं आहे. पांच वर्सं झालीं. अजून बरं होत नाहीं.

**बजर०**–ह्याला कारण तूंच आहेस. नवऱ्याचा डोळा चुकवून गुंगारे मारायचे सोडून दे, म्हणजे तो बरा होईल. त्याच्या मनाचा खेद जाऊन त्याचा हृद्रोग जाईल.

**ति० स्त्री**–आमच्या ह्या यमनाबाईचीं मुलं जगत नाहींत ह्याला उपाय काय करावा ?

**बजर०**–तिच्या नवऱ्यानं सगळ्या तऱ्हेची बद्कर्मं सोडावी. ईशभजन करावं.

च० स्त्री–आमच्या घरीं व्यापारांत नेहमीं तोटा येतो याचं कारण काय ?

बजर०–मनोराज्य ! कृतीपेक्षां मचमच फार !

पार्वती–आम्हांला इतका पैका मिळतो पण बरकत कां येत नाहीं ?

बजर०–चोरांच्या हवेल्या उठायच्याच नाहींत. ह्या हातावरचे झाडे त्या हातावर लवकरच द्यावे लागतील. थोडा अवकाश आहे.

सावित्री–ह्या प्रांतांतला दुष्काळ संपून गरीबांना सुख केव्हां लागेल ?

बजर०–तुझे यजमान–भगवद्भक्त दामाजीपंत पुऱ्या कसोटीला उतरल्यावर. ( आवडा येते. )

आवडा–मग ह्याला अवकाश किती आहे ?

बजर०–तुझ्या चरित्राची फजीती होण्याचाच !

आवडा–त्याला वेळ किती आहे ?

बजर०–दोन महिने.

आवडा–माझे गेलेले दागिने मला केव्हां मिळतील ?

बजर०–ते ज्याचे होते त्यानं नेले. जे तुझे नव्हतेच ते तुला परत कसे मिळणार ?

आवडा–ते मिळवायला मला कांहींच श्रम पडले नाहींत का ?

बजर०–तुझ्या श्रमांच्या मोबदल्याइतके तुझ्याजवळ आहेत.

आवडा–असं काय ! हा सगळा भामट्यांचा बाजार आहे.

पार्वती–तूंही त्याच बाजारांतली भामटी आहेस !

( दूर दूर जा परेहो दूर बेश ऊर तूं. )

आवडा–पुरे पुरे तुझीग जीभ बंद मी करी पहा ॥
घालुनी मुजूमदार बंधनीं झणीं अहा ॥ ध्रु० ॥

पार्वती–तुझिच बघ मी करिन छी थू ॥
आवडा–अग जाग तुझी काय बिशाद् ॥
पार्वती–घे तुला ह्मणी हीच लाथ ॥
आवडा–तुझं वाट्टोळं होउ तुला माझा ग शाप ॥
पार्वती–जाग माझ्या घरून–अग–चल्–निघ्–जा ॥
( मुजूमदार येतो. )

मुजूमदार–अरे हो–हो–हो ॥
गप्प बसा स्वस्थ असा ॥
काय हा प्रकार असा ? ॥
बजर०–साराच अंधेर झाला कसा ? ॥
–ऐका–पातिव्रत्य धर्म ऐका !

ओंव्या.

जीकां विसरुनि पतिआज्ञेशीं ॥ वर्तते कुलस्त्री सासुरवाशी ॥ पतिव्रता ऐशिया पदाशीं ॥ ती कधीं न पवे ॥ १ ॥ नेसलें वस्त्र जी सारी वारंवार ॥ काढी पदर जी टीचभर ॥ लेई तंग चोळी हांसे फार ॥ ती पतिव्रतापद न पवे ॥ २ ॥ पर पुरुषातें देखोनी ॥ पादनखें भूमीवरी ओढोनी ॥ चिटक्या वाजवी जांभळोनी ॥ ती पतिव्रतापद न पवे ॥ पतिदैवत बोलोनि वदनीं ॥ अन्य पुरुषा पूजी जी मनीं ॥ श्वास सोडोनी बघते स्तनीं ॥ ती पतिव्रतापद न पवे ॥ ४ ॥ परनरस्पर्श जरी न घडे ॥ तन्मूर्ति जरी नुसती मनीं जडे ॥ पातिव्रत्या पुरें तेंचि सांकडें ॥ भ्रष्टस्थान तें जाणावें ॥ ५ ॥

अशा तऱ्हेचा हा पातिव्रत्यधर्म आहे. ह्या सर्व गोष्टींपासून इथें जमलेल्या स्त्रियांपैकीं ज्या कोणीं अलिप्त असतील त्यांनीं पुढें यावं. त्यांनाच ह्या हातांत हळदकुंकु सांपडेल. कोण असेल तिनं पुढें यावं.

सावित्री–( स्वगत ) ह्यांपैकीं कोणचंच पातक जर माझ्याकडून घडलं नाहीं, तर मीं पुढें होऊन देवीचा प्रसाद कां न घ्यावा ! ( उघड ) आई माते,––

( नच सुंदरि करुं कोपा० )

जय अंबे जगदंबे ॥ जनमनतोषकदंबे ॥
सच्चित्पदप्रारंभे ॥ पाव जगत्स्तंभे ॥ ध्रु० ॥
नीतिपथीं नच मळली ॥ मति मम पतिपदकमलीं ॥
दुर्बुद्धी नच शिवली ॥ दुःखि मनें तोषियलीं ॥
गरिब कुळें पोषियलीं ॥ तत्सेवा सोशियली ॥
॥ चाल ॥ साक्ष मला राहुनियां ॥ प्रसाद करि अंबे ॥ ध्रु० ॥

( सावित्रीबाई पुढें होऊन प्रसाद घेते व नंतर मुजूमदार बोलतो. )

**मुजूमदार**–आमचीलाही असाच प्रसाद कां मिळूं नये ?

**बजर०**–तुमचीचंही जर ह्या सावित्रीबाईसारखं वर्तन असेल तर तिनंही पुढें यावं !

**मुजूमदार**–कायग, हा प्रसाद न मिळण्याइतकी तूं अपवित्र नाहींस ना ?

**पार्वती**–आजपर्यंत माझ्या हातून कोणचंही जरी अनीतीचं वर्तन घडलं नाहीं तरी मी नेहमीं इकडली आज्ञा मोडतें. ही गोष्ट माझ्या मनाला डिंवचते आहे. त्यामुळें प्रसाद मिळण्याच्या नकाराची भीति वाटते. मला पश्चात्ताप वाटतो.

**मुजूमदार**–तुझ्यासारखंच प्रत्येक स्त्रीचं मन जर पश्चात्तापानं पुनीत झालं, तर तोच देवाचा प्रसाद म्हणायला काय हरकत आहे ! हो पुढें ! 'पतिआज्ञा शिरसावंद्य मानीन' असं देवीपुढें कबूल कर. इतकं झाल्यावर प्रसाद मिळालाच पाहिजे.

**पार्वती**–जय आई माते, माझ्या हातून आजपर्यंत पतिआज्ञेचं उल्लंघन झालं. त्याबद्दल मला पश्चात्ताप होतो आहे. दुसरं अनीतीचं वर्तन कोणचंच मी केलं नाहीं हें तूं जाणते आहेसच. तेव्हां मला प्रसाद देऊन पुनीत कर.

**बजर०**–( प्रसाद देऊन ) लक्षांत ठेव ! इतउत्तर माझं–माझं मी–मी–करून भांडायचं सोडून दे ! नाहीं तर अधोगतीला जाशील !

**आवडा**–( स्वगत ) आतां आपली इथें राहण्याची सोय नाहीं. ठरल्याप्रमाणें बेदरास जाऊन सूड घेतलाच पाहिजे. ( मागच्या मागें जाते. )

**सावित्री**–इथें जमलेल्या सगळ्या बायकांना पश्चात्ताप झाला आहे. राग सोडून परोपकार करणं आणि पतिआज्ञा हेंच दैवत मानणं–ह्या गोष्टी त्यांना कबूल झाल्या आहेत असं दिसतं. त्यांना प्रसाद देऊन पावन करावं!

**बजर०**–ह्या सति पतिव्रता सावित्रीबाईच्या भाषणाकडे लक्ष द्या. कुलस्त्रियांनीं त्यांच्याचसारखं वर्तन ठेवावं. त्यांतच त्यांचा मोक्ष आहे. त्यांच्या शब्दाला मान देण्याकरतांच मी हा प्रसाद सगळ्यांना देत आहें. ( सगळ्या स्त्रिया प्रसाद घेतात. )

**मुजूमदार**–आज ह्या सर्व स्त्रिया जशा जगदंबेच्या प्रसादानं पावन झाल्या तशी आवडाही पावन झाली असती तर बरं झालं असतं. पण ती कमनशीबाची त्याला उपाय काय?

**बजर०**–सध्यांच्या दुष्काळांत–मुजूमदारांनीं बजरबट्टूच्या मदतीनं–प्रजेपासून अतिशय पैका खाऊन–आवडीलाही फसवली आहे, अशी बातमी देण्याकरतां ती बादशहाकडे बेदरास निघून गेली. आपल्या गायनानं ती बादशहाला खूष करून मोहक स्वरूपाचा पगडा त्याच्या मनावर बसवण्याची खटपट करणार आहे. अशा रीतीनं ती त्या राजहंसाच्या पंखांत गेली म्हणजे मुजूमदाराचा सूड घ्यायला तिला वेळ नाहीं. बजरबट्टूला पोत्यांत घालून ठार मारायचा तिनं नुकताच प्रयत्न केला होता; पण तो फसला.

**मुजूमदार**–असं आहे काय? तर मग, मलाही माझ्या संरक्षणाची व्यवस्था केलीच पाहिजे.

**बजर०**–देव साह्यकारी झाल्याशिवाय तें होणं शक्य नाहीं. असो. मी आतां जातें.

पार्वती–आई संतुष्ट आहेसना ? माझं घर शांत राहीलना ?

बजर०–मुजूमदारांवर लवकरच मोठा प्रसंग येईल; पण दामाजीपंतांच्या मदतीनं ते त्यांतून पार पडतील. तुझ्यासारखेच पश्चात्तापानं ते पुनीत होतील. मी संतुष्ट आहें. येतें आतां. ( अंगांतलें जातें. )

दामाजी–बरं आहे. मुजूमदार आम्हींही येतों आतां. ही पहाटेची वेळ मोठी चमत्कारिक दिसते आहे. ह्यावेळीं हा अरुणोदय–

( प्रिये पहा रात्रीचा० )

गमे मला रक्तशिलापथलंघित येत भानुसुरथ हा ॥ ध्रु० ॥
गंडस्थल करिचें तें ॥ भेदुनि हरिमुख घेतें ॥
रक्तपणा तत्सम किति ॥ पूर्वप्रांत लाल हा ॥ ध्रु० ॥

मुजूमदार–तें तर खरंच. पण मला वाटतं हें आकाश म्हणजे ह्यावेळीं–

( चाल वरचीच )

कनकवर्ण सूतग्रसित ॥ पंडित कीं द्रव्यरहित ॥
चंद्रबिंब तेजगलित ॥ अबुधसंधिं बुध अहा ॥ ध्रु० ॥

सावित्री, पार्वती–ईशभजन विसरुनियां ॥ निद्रित जे जीव तयां ॥ येइ रवी उठवाया ॥ तिमिरनाश करुनि हा ॥ ध्रु० ॥

( पडदा पडतो. )

अंक तिसरा समाप्त.

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

( रस्त्यावर बजरबट्टू येतो. )

**बजर०**—घेतलेलं सोंग कसं काय वठवतां येतं तें बघायचं होतं ; पण आतां काय ? सोंगाची प्रस्तावना संपून शेवट सुद्धां होत आला. आतां—बतावणी करतां येईल कीं नाहीं ही शंका कशाला ? आतांपर्यंत आमचं शहाणपण भोळसटपणाच्या छत्री-खालीं दबलं गेलं ; पण आतांच काय ती आमच्या अकलेची शिफारस होण्याची वेळ आली आहे. आवडी तर पुरी चीत पडली. राह्यला काय तो आतां मुजूमदार ; पण त्याची मोठीशी बिशाद नाहीं. आमच्या अकलेच्या बुळबुळीत शेवाळावर तो भरंवशानं झोंकांत उभा असल्याकारणानं त्याला झोंका देऊन सपशेल पालथा पाडायला आतां वेळ तो कितीसा लागणार ? आपल्या सुवासिक फुलांकडन वसंतऋतूचं आदरातिथ्य केलं म्हणजे झाडं जशी आपल्या कामगिरींतून पार पडतात, त्याप्र-माणेंच आतां त्या उदार दामाजीला ह्यावेळीं योग्य मदत केली म्हणजे मीही एका मोठ्या कामगिरींतून पार पडलों असं होणार आहे. चला तर आतां त्यांच्याचकडे. हेंच त्यांचं घर. ( जातो व **दामाजी** आपल्या घरीं ओटीवर बसला आहे आणि **सावित्रीबाई** दरवाज्यांत उभी आहे असा प्रवेश उघडतो. )

**दामाजी**—अग, हें पहा—काळजी करण्याचं कांहीं कारण नाहीं. हंबे—हंबे करून पोटासाठीं टाहो पिटणारं वासरूं, जर गाय दूर लोटूं लागली, तर तिच्या गोरसाचा फायदा काय आम्हीं तिसऱ्यांनींच घ्यायचा ? गाईच्या दुधावर जसा खरा

वारसा वासराचा, तसाच क्षुधेनं पीडलेल्यांचा ह्या कोठारांवर आहे. कोठारांतलं धान्य त्या बिचाऱ्यांना मनसोक्त मिळाल्या-मुळें ते किती सुप्रसन्न दिसूं लागले तें तूं बघितलंसच. अग्नि-स्पर्शानं पेटवलेला कापुर जसा आपल्या प्रभेच्या जोरानं काळ्या धुराला दूर लोटीत असतो, त्याप्रमाणेंच त्या दुष्काळग्रस्तांना धान्याची ऊब मिळतांच त्यांची काळींठिक्कर पडलेलीं तोंडं सतेज दिसूं लागलीं. त्यावेळीं मला तर असं वाटलं–

( पाहा पाहा काय सुंदर० )

जलामध्यें बिंब अस्थिर ॥ नभीं परि तो पूर्ण भास्कर ॥
ईश तैसा पृथ्विवर ॥ व्यापूनियां राहि अंबरभर ॥ ध्रु० ॥
सूर्य येतां मध्यबिंदुंत ॥ होई छाया पायिं ती रत ॥
तैशीं दैन्यें वरिति तो पथ ॥ दिसलें हें मज तन्मुखांवर ॥ध्रु० ॥

सावित्री–कां नाहीं दिसणार ? बोंडं फुललेलं कापसाचं रान आणि वणव्यानं जळलेलं रान ह्यांत अंतर दिसायचंच. ( बजर-बट्टू येतो. )

दामाजी–या. बसा. काय हकीकत आहे ?

बजर०–आजपर्यंत सुरू असलेल्या कपटनाटकाचा पुरा शेवट होण्याची वेळ समीप आली असल्यामुळें, त्यांतलं मुख्य बीज, आतांच आपल्याला सांगण्याची वेळ आली आहे.

दामाजी–तें काय ?

बजर०–आपली माझी पहिली भेट झाली तेव्हां 'मला एक द्रव्याचं झाड सांपडलं आहे' असं मी आपल्याला सांगितलेलं आठवत असेलच.

दामाजी–हो–आठवतं खरं.

बजर०–तर मग तें झाड कोणचं हें आजपर्यंत आपण मला विचारलं नाहीं ?

दामाजी–विचारण्याचं कारणच नाहीं.

बजर०–कां बरं? मी आणून दिलेलं द्रव्य मग कसं आपण स्वीकारीत होतां?

दामाजी–तें द्रव्य धर्मदायाकरतां आपण मला आणून देत होतां म्हणून तें मी घेऊन लागलींच त्याचा धर्म करीत असें.

बजर०–असो. तें ज्यांचं त्यांना मिळत असे हेंच ठीक होत होतं.

दामाजी–म्हणजे काय?

बजर०–ह्याचा अर्थ असा कीं, जें द्रव्य पाटील, कुळकर्णी आणि आवडी ह्यांच्या साह्यानं मुजूमदार–खोट्या पावत्या तयार करून शेतकरी वगैरे लोकाकडून खात असे–तें मी आपल्याजवळ आणून देऊन त्याचा त्यांना धर्म करवीत असें.

दामाजी–साराच चमत्कार! पण हें मुजूमदारांना कळलं कसं नाहीं?

बजर०–त्यांच्या नेहमींच्या योग्य खर्चाला मीं कधींच अडचण पडूं दिली नाहीं म्हणून!

दामाजी–तुम्ही त्यांचे खजीनदार होतां होय?

बजर०–मी त्यांचा खजीनदार होतों, म्हणूनच तर मला इतकं गारूड करतां आलं. शिवाय–गरीबांच्या द्रव्यावर गबर झालेल्या आवडीलाही मीं सपशेल पाडली. ह्याचकरतां मुजूमदारांची आणि माझी हकीकत सांगायला ती आतां बेदरास निघून गेली आहे.

दामाजी–मग आतां? पुढें काय विचार?

बजर०–आपलीही बोळवण इथून बेदरापर्यंत राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल लवकरच निघेल–असा पुढला विचार आहे. कारण, मुजूमदारांचं इंगित फोडण्याकरतां बादशहाकडे आवडी कधींच

जाऊन पोंचली आणि आतां मुजूमदार स्वतःच्या पत्राच्या पाठो-पाठ ‘ धान्याचीं कोठारं दामाजीपंतांनीं लुटवलीं ’ ही हकीकत सांगण्याकरतां इथून चार दिवसांपूर्वी निघून गेले आहेत.

**सावित्री**—मला वाटलंच होतं कीं तो कानडा असं कांहीं करील म्हणून.

**बजर०**—पण त्यांत भिण्याचं कारण कांहींच नाहीं. त्यानं आजपर्यंत केलेल्या लबाड्यांचे हस्तलिखित पुरावे आवडीजवळ भरपूर आहेत. ते सगळे ती बरोबर घेऊन गेली आहे.

**दामाजी**—परमेश्वरा, माझ्यावर येणाऱ्या प्रसंगाबद्दल मला कांहींच वाटत नाहीं; पण यःकश्चित् एका बाजारबस्वीकडून मुजूमदारासारख्या मोठ्या अधिकाऱ्याची आतां बेअब्रु होणार हें मात्र ह्या कानांना ऐकवणार नाहीं. बाकी, मुजूमदार कशा स्वभावाचे होते हें मी पूर्णपणें ओळखून होतों. त्यांना मी—

**दिंडी.**

**सुमनवेणी खुलविते वेणिला ती ॥**
**मोह घालुनि गुंगवी मानवा ती ॥**
**नागफणिचा आकडा परी तो कीं ॥**
**मुजुमदारा पाहिं मी तसा लोकीं ॥ १ ॥**

**बजर०**—अगदीं खरी गोष्ट. बहुतकरून बेदरच्या दरबारांत आपल्या संबंधानं कांहीं तरी चमत्कारिक प्रकार घडून त्याचं प्रायश्चित्त आपणाला लवकरच मिळणार ही गोष्ट जरी खरी आहे, तरी मुजूमदाराला ह्या बाबतींत अत्यंत कष्ट सोसावे लागतील असं मला वाटतं.

**दामाजी**—त्याचं कारण काय?

**बजर०**—धान्याचीं कोठारं लुटवण्यापेक्षां प्रजेपासून अन्यायानं पैसा खाणं हा मोठा अपराध आहे असं न्यायदेवता बोलणार नाहीं काय?

**दामाजी**–जागी असेल तर बोलेल.

**बजर०**–ती निजली असेल, तर तिला जागी करण्याचं काम मी करतों. आपल्यावर आतां पुढें येणारा प्रसंग मोठा बिकट आहे; पण तो धैर्यानं सांवरून धरा.

**सावित्री**–भक्तांचं खरं संकट वारणारा पांडुरंगाशिवाय कोण आहे? पांडवांच्याकडून द्यूत खेळवून त्यांना वनवासांत धाडण्याचा त्या श्रीरंगाचा जो हेतु होता तोच इकडून धान्याचीं कोठारं लुटवण्यांत नसेल कशावरून?

**बजर०**–आपणां उभयतांची भक्तीच आपणांला ह्या संकटांतून तारून नेईल. मी येतों आतां.

**दामाजी**–ठीक आहे. ( बजरबट्टू जातो. )

**सावित्री**–आपण कांहीं एक चिंता करूं नये. कारण–

( अंकित पदांबुजाची दासी० )

**विठ्ठल खरा असे हो न्यायी ॥ करिल तो, माय–अंगायी ॥ ध्रु० ॥**
**सद्भक्तीच्या नौकेमध्यें, स्वस्थ रमूं त्या पायीं ॥ १ ॥**
**पतिसेवा मम वल्हविल नौका, भवजलनिधितुनि पार बाई ॥ खरा० ॥**

( एक जमादार व दोन चार मुसलमान येतात. )

**जमादार**–खाविंद, आप तो पादशाहाके ठाणेदार–बडे अफ्सर हो. मगर बेदरके बडे गरिबन्नवाज–शुक्र हुतालाके मर्जी मुजब कारवाई करनेवाले गोया सल्तनत् हुमायूनशहा पादशाहानें आपकेपास हम्को भेजकर पहिले वोह् कानडा मुजूमदारको पऱ्हेज करनेखातर यह मोहोरबंद हुक्म भेजा है! ( लखोटा देतो. )

**दामाजी**–( लखोटा फोडतांना. ) फौरन्, वोह तो हुजूरे आलि तख्तनसीन पादशाहाकी मुलाखात लेने गया है–उस्को चार दीन होगये.

**जमादार**–बहोत खूब. ( दुसरा लखोटा देऊन ) यह दूसरा हुक्म खुद आपके वास्ते है!

**दामाजी**–( वाचल्यावर ) हुजूरका हुक्म मुजे कुबूल है. पादशाहाके तख्तके साम्ने यह हुक्मके मुआफिक हजीर होनेको मै तयार हूं. लेकिन् जरा सब्र करो.

**सावित्री**–क्षयरोग्याचं मरण जसं बरेच दिवस लांबून चालून यतांयेतां थकतं नि रोग्याचे हाल होतात, त्याप्रमाणेंच आमच्याबर येणारं विघ्न जें थोडंसं दूर दिसत होतं तें तत्काळ जवळ येऊन ठेपलं हें तरी एक दु:खांत सुखच मानायचं. सोक्ष कीं मोक्ष, ताबडतोब झालेला बरा.

**दामाजी**–अशा तऱ्हेचा सरकारी हुकूम आला म्हणजे एक क्षणही दवडतां कामा नये. ह्या घरांत तूं पांडुरंगाचं भजन करीत स्वस्थ रहावंस असं मला वाटतं. ह्यावर तुझी इच्छा काय आहे?

**सावित्री**–आपण राजाज्ञेप्रमाणें शांतचित्तानं बेदरास जावं. ह्या घरावर तुळशीपत्र ठेवून मी हें कृष्णार्पण करतें आणि आपल्या मागोंमाग पंढरपुराला जाऊन स्वस्थचित्तानं भक्ति आणि भाव यांच्या संगतींत राहतें.

**दामाजी**–फार उत्तम. अच्छा है. जमेदारसाहेब, अब इस बारेमें हमारी राय आप सूनोंगे तो बडी मेहेरबानी होयगी.

**जमादार**–साहेब, कौन्से बारेमे आप्की राय सुन्ना यह मुजे फर्मादो.

**दामाजी**–इत्ने दीन मै पादशाहाका बहोत जबाबदारीका अफ्सर था. मगर इस हाल मै तुमारा कैदी होगया है ये मै जानताहूं. आप जो हमारे उपर मेहेरनजर करोगे तो रास्तेमे हमारा पंढरपूरनामका एक ठिकाना आपको मिलेगा. उधर हमारे भगवत्‌जी विठ्ठल नामके है. उस्का दर्सन लेके आप सब बेदरके तरफ आगे बढेंगे.

**जमादार**–बहोत खूब. इन्शा हुतालाने आपके उपर बडी कजा लायी है. लेकिन हमे आपकी आगलकी दानिष्मंदी–जाहेर है. आप बडे खानदानके अफ्सर थे. आपको पऱ्हेज करनेका अल्ला हुतालाने हम्को मौका दिया यह बात बिल्कुल् बुरी हो चुकी. लेकिन क्या करना ? हुक्मकी तामील बजाना जुरूर है.

**दामाजी**–हमारे अरजको आप्ने इझत् किया उस्‌लिये हमे बहोत खूषी मालुम होती है.

**जमादार**–हाम् कौन है ? आप विठ्ठलकी जो इबादत करते हो वोह चारोतरफ सबको जाहेर है. अल्लाकी बंदगी बजानेवाला आपसरीखा दूसरा कौन है ! आपकी विठ्ठलकी पुरश्‍त आपको आखीर खूषी देगी. आपको खूषी देनेवाला और विनंती माननेवाला मै कोन हूं ?

**सावित्री**–बिचाऱ्याच्या तोंडांत साखर पडो.

**दामाजी**–विठ्ठला, आतां तुझ्या दर्शनाकरतां मी इथून निघालों आहें. तूं सर्वत्र जरी आहेस, तरी तुझं खरं स्वरूप ह्या डोळ्यांना पंढरीक्षेत्रांतच दिसतं. तुझं अखेरचं दर्शन घेण्याकरतांच मी आतां तुझ्यापाशीं येतों आहें. मला कडकडून भेट. मला योग्य न्याय दे. विनाकारण राजद्रोहांत मरण आलं असतां माझे पूर्वज पितृलोकांत खिन्न होतील. म्हणून म्हणतों मला न्यायानं मरण येऊंदे. मी मरणाला भीत नाहीं. मला कोणाच्याही मायापाशांत अडकण्याची भीति नाहीं. बायकोचाच कायतो एक मायापाश. पण तीही माझ्याप्रमाणेंच विदेही आहे. मृत्युबद्दल––

( म्हातारा इतुका० )

मूढमति अखिलांस वाटे मृत्यु कट्टतर फास ॥
ज्ञाते भीति न त्यास ॥ वाटे मृत्यु० ॥

आत्मा वपुला सोडुनि जायी एक जसा दुसऱ्यास ॥
मृत्यु आहे मार्ग मुक्तिचा ॥ नवल नसे हें खास ॥ वाटे० ॥
मृत्युदंष्ट्रा द्वार मुक्तिचें आहे ह्या जीवास ॥
गवसुनि अंतरिं तीच्या सत्वरि जातो तो स्वर्गास ॥ वाटे० ॥

—बरं आहे. आम्हीं आतां असेच निघतों. ह्या वास्तूला आमचा कंटाळा आला असं जर कोणी म्हणेल, तर तें मात्र अगदिं खोटं ठरणार आहे. झाडावर फुलणाऱ्या फुलाचा झाडाला कंटाळा येणं जसं संभवनीय नाहीं किंवा मातेला आपल्या मुलाची नावड झाली असं कुठेंच ऐकूं यायचं नाहीं तद्वतच हें आहे. झाडापासून फूल तोडणारा जसा दुसराच असतो त्याचप्रमाणें वास्तूपासून आम्हांला दूर करणारं आमचं कर्म तिऱ्हाइतच असतं. असो—हे वास्तु-पुरुषा—

साकी.

कुलदैवत तें तव मैत्रीला राहुनि कुललय झाला ॥
संततिविरहित मी हा म्हणुनी, वाटे मम चित्ताला ॥
शेवटिं नमन तुला ॥ करितों, ठेवी लोभाला ॥ १ ॥

( सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

( मुजूमदार दाढी लावून भिक्षुकाच्या सोंगांत रानांतल्या रस्त्यांत येतो. )

**मुजूमदार**—वाटलं होतं कीं, माझं पत्र माती घेऊन उठल्याशि-वाय कधीं राहणार नाहीं. पण सर्वच बाजार आटपला. आवडीनं माझ्या भावी वैभवाची इमारत जमीनदोस्त केलीन. दामा-जीची ठाणेदारी मला मिळावी, म्हणून मी खटपट करण्याकरतां पत्राच्या मागोमाग गेलों—पण बरं झालं—रस्त्यांतच बातमी कळली. आवडीनं जो आपला शहाणपणा बादशहाकडे दाख-वलान त्याचमुळें मला बादशहाचं धरणं आलं. त्याचमुळें

मला आतां ह्या असल्या छद्मवेषांत छपून राहणं भाग पडलं आहे. ( दाढी काढून ) ही दाढी अनवठीला–कानांवर आणि ओंठांवर किती तरी जाचते आहे. पण उपाय काय? ह्या असल्या कृत्रिम दाढ्यामिशा नाटकी लोकांना त्यांच्या पोटाकरतां जशा छळतात, तद्वतच आवडीसारख्या वेश्यांची स्थिति आहे. ह्या वेश्या म्हणजे–मोठ्या हरामखोर! खरोखर—

( लक्ष्मसिम. )

वेश्यांची प्रीति अती क्षणिक ती असे ॥
वायूच्या लहरीसम जगतिं या वसे ॥ ध्रु० ॥
संध्येच्या मेघांवरि ॥ लाल रंग शोभे परि ॥
क्षणिक दिसुनि होइ दुरी ॥ प्रेम तसें पुरुषांवरि ॥
दाविति ह्या दुष्ट नारि ॥ द्रव्यतृषित जात पुरी ॥
कपटी ह्यां हृदय कसें मुळिंच तें नसे ॥ ध्रु० ॥

( बजरबट्टूला दुरून पाहून )

अरे हा तर आमचा बजरबट्टू! हा त्या झाडाखालीं माझ्याकडे तर बघत उभा नाहींना! कांहीं असो. चला, दाढीबाई, व्हा पुन्हां स्थानापन्न. ( दाढी लावतो. ) आपण आतां त्या पलीकडल्या दत्तमंदिरांत जाऊन बसावं म्हणजे झालं. ( जाऊं लागतो इतक्यांत बजरबट्टू त्याला हाका मारतो. )

**बजर०**–अहो–अहो दाढीकाका, जरा थांबा! मला तुमच्याशीं थोडं काम आहे.

**मुजूमदार**–परमेश्वरभक्तीशिवाय मी कोणाचीं कामं बिमं करीत नसतों.

**बजर०**–माझं काम कांहींएक करूं नका. फक्त मंगळवेढ्याचे मुजूमदार ह्या रस्त्यानं गेलेले जर तुम्हीं बघितले असतील तर बोला.

**मुजूमदार**–मुजूमदार बिजूमदार मला कांहीं एक माहीत नाहीं.

**बजर०**–बिजूमदारांशी मला काय करायचं आहे ? मुजूमदारांबद्दल सांगा. तुम्हीं त्यांना बघितले असावे असं वाटतं. कारण, मी तुम्हाला बघतों आहें.

**मुजूमदार**–वाः हा सिद्धांत फारच नामी ! पण ते कसे आहेत ते तुम्हींच सांगाना !

**बजर०**–ते चांगले निरोगी, सुरेख अगदीं तुमच्या सारखे–

**मुजूमदार**–( दचकून ) म्हणजे ?

**बजर०**–दचकायचं कांहीं कारण नाहीं. अगदीं हुबेहुब तुमच्या सारखे ते आहेत.

**मुजूमदार**–अहो, म्हणजे काय ?

**बजर०**–ह्याचा अर्थ इतकाच कीं, तुम्हांला दाढी आहे आणि त्यांना ती नव्हती. आठ दहा दिवसांत जर त्यांची दाढी एवढी वाढली असेल तर निराळी गोष्ट.

**मुजूमदार**–बरं त्यांची आणि तुमची गांठ घालून दिली तर मला काय द्याल ?

**बजर०**–तुम्हीं निरपेक्ष ! ईशभक्ति हेंच तुमचं सर्वस्व. तेव्हां मीं तुम्हांला कांहीं जरी दिलं तरी तें कसं आवडणार ?

**मुजूमदार**–बरं, त्यांना तरी कांहीं देणार का ?

**बजर०**–हो–हो ! एक उत्कृष्ट सल्ला देईन.

**मुजूमदार**–मग, त्यांच्या जागीं मलाच मुजूमदार समजून मलाच द्यानांत तो सल्ला !

**बजर०**–हा न्याय खूप आहे बुवा ! नुसत्या समजुतीनं कसं भागणार ? दुसऱ्याच्या स्त्रीला आपलीच स्त्री म्हटलं तर खेटरं

खावीं लागतील–खेटरं. तुम्हांला जर दाढी नसती तर मात्र तेच तुम्हीं असं मीं म्हटलं असतं.

**मुजूमदार**–असं जर आहे तर ही पहा ( दाढी काढून ) दाढी काढून टाकली.

**बजर०**–ओहोहो–मुजूमदारसाहेब, कोणच्या नाटक्याची ही दाढी आणलीत? तुम्हीं नाटकी ऋषी चांगले दिसाल.

**मुजूमदार**–हें पहा–आतां उगीच वात्रटपणा करूं नकोस. ती पहा समोरून माणसं येताहेत. त्यांनीं जर कां मला ओळखलं तर बातमी फुटून हत्तीच्या पायांशीं मरावं लागेल.

**बजर०**–अहो, हत्ती म्हणजे तर गजांत लक्ष्मी. अन् लक्ष्मीच्या आराधनेंत तर सगळं जग गुंतलेलं. मग त्याच स्थितींत–

**मुजूमदार**–बोलतोस कां नाहीं लवकर! कां मी आपला दाढी लावून फरारी होऊं?

**बजर०**–काय, दाढी लावून फरारी व्हायचं? लुगडं नेसून कां होत नाहीं फरारी? छे बुवा–आपल्याला नाहीं हें पसंत. मर्दांनीं तकवा सोडणं अगदीं वाईट. आलेल्या संकटांतून पार पडण्याची शहाजोग युक्ति सुचूं नये म्हणजे आश्चर्य आहे?

**मुजूमदार**–वाटेल तें असो. बोल आतां मी कसं करूं तें?

**बजर०**–ऐका–बादशहाचे लोक तुम्हांला पकडायला आले म्हणजे बेलाशक तुम्हीं त्यांच्या स्वाधीन व्हा––

**मुजूमदार**–वाः खूप युक्ति सांगितलीस बुवा?

**बजर०**–अहो पण ऐका तर खरं?

**मुजूमदार**–ऐका काय डोंबलं. ताबडतोब मरायची युक्ति ही.

**बजर०**–मी सांगतों ती युक्ति जर कराल तर तिनं तुम्हीं ताबडतोब न मरतां मरेपर्यंत जगाल. मग मरायची भीतिच तुम्हांला राहणार नाहीं.

**मुजूमदार**–तूं आपल्या भाषणचमत्कारानं मेल्यावर सुद्धां जगाला हांसवशील. पुरे आतां हा विनोद. युक्ति काय ती बोल?

**बजर०**–बादशहापुढें तुम्ही उभे राह्यल्यावर सर्व गोष्टी माझ्यावर ढकला म्हणजे झालं. तुम्हांला बादशहानं कोणचाही प्रश्न विचारला तरी–फैं–म्हणा म्हणजे संपलं.

**मुजूमदार**–म्हणजे तुझं म्हणणं–मी वेड्याचं सोंग घेऊं होय?

**बजर०**–अलबत्.

**मुजूमदार**–वाहवा! खूप! शुद्धिवर आणण्याकरतां हकीमाकडून डाग दिला म्हणजे?

**बजर०**–सहन केला पाहिजे. लक्ष्मी काय फुकट जिरते होय?

**मुजूमदार**–बरं, आजपर्यंत मीं तुजजवळ दिलेल्या द्रव्याची तूं काय व्यवस्था केली आहेस?

**बजर०**–अगदीं सुरक्षित जागीं तें ठेवलं आहे. त्याला चोरांची बिलकुल भीति नाहीं.

**मुजूमदार**–ठीक आहे. चल तर मग. तें पलीकडे दत्ताचं देवालय आहे, तिथें जाऊन त्या पलीकडल्या नदीवर स्नान करूं. शंकराची पूजा करून पुढें होऊं.

**बजर०**–दत्ताच्या देवळांत पूजेकरतां सांभाचं लिंग कुठलं सांपडणार?

**मुजूमदार**–अरे, दत्ताला तीन तोंडं नसतात का?

**बजर०**–बरं मग?

**मुजूमदार**–मग काय? त्यांतलं एक शंकराचं असतं.

**बजर०**–शंकराच्या तोंडाची पूजा शास्त्रोक्त आहे का?

**मुजूमदार**–अरे बाबा, अमुकच पाहिजे म्हणून आडून बस-

ण्यांत अर्थ काय? वनवासांत रामफळाच्या ऐवजीं शिताफळावरच भागवावं लागतं. चल, आतां--

( यारके घरचल जाके० )

जाऊंरे शिवहर वदूनि स्मरहर पुजूं तराया ॥ ध्रु० ॥
सूर्यास जैशी तममयरजनी ॥ सिंधूंत बुडवी स्वकरीं धरुनी ॥ तैशींच विघ्नें शिव शिरिं धरुनी ॥ मोडूनि काढूं अरिमतिमधुनी ॥ विनति करूं शिवपायां ॥ दुःखमुक्त व्हाया ॥ अर्पूनि काया ॥ अमरवर जाऊं पुजाया ॥ ध्रु० ॥

( दोघे जातात. )

---

## प्रवेश तिसरा.

[ रानांतील जुनें दत्तमंदीर–दामाजीपंताकडे भिक्षेला आलेला पंढरपूरचा ब्राम्हण–गोमुखींत हात घालून मुद्रा लावून बसला आहे. ]

**ब्राह्मण**–मधुमासामध्यें टोळांनीं फन्ना उडवलेल्या आम्रवृक्षावर बसून कोकिळ ओरडूं लागली तरी तिचा आवाज जसा कर्णकठोर होत नाहीं–त्याचप्रमाणें–शत्रूंनीं जरी आज द्वेषबुद्धीनं दामाजीपंतांवर राजद्रोहासारखं भयंकर संकट आणलं आहे तरी त्या उदारधीनं दुष्काळपीडितांचे प्राण वांचवण्याकरतां जें मोठं कृत्य केलं आहे तें सज्जनांना कधीं तरी नयनत्याज्य वाटेल काय? अहाहा! काय त्या थोराची थोरवी! नाहीं तर तो हलकट मुजूमदार! प्रत्यक्ष राहूच त्या दामाजीचंद्राला ग्रहण लावायला उत्पन्न झाला आहे. दामाजीपंतांवर आजपर्यंत मी दोनदां माझ्या कुटुंबाचं संरक्षण केलं. आणि शेवटीं धान्याचीं कोठारं लुटण्याच्या कामांतही मीच अग्रेसर होतों. असं असतां, आम्हां दीन जनांच्या अन्नदात्याकरतां मी जो ह्या दत्तमंदिरांत धरणं धरून बसलों आहें तो देव माझ्या विनं-

तीला कांहींच मान देणार नाहीं काय? दुष्काळग्रस्तांना वांचवण्याऱ्या राजद्रोहाबद्दल जर दामाजीपंतांना राजदंड होत असेल तर आम्ही तरी स्वहस्तें देहदंड कां करून घेऊं नये?

( ब्राह्मण संध्या करूं लागतो व दोन मुसलमान येतात. )

प० मु०—क्यौंबे बम्मन, तुमारा नाम क्या?

ब्राह्मण—( उपस्थान म्हणायला उभा राहून ) मित्रो——

दु० मु०—तुम् कहां जानेवाले हो?

ब्राह्मण—( बसून स्वगत ) आतां काय करावं? ही मुसलमानांची जात म्हणजे अगदीं अडदांड! उत्तर दिलं नाहीं तर मानच कापणार! बरं आन्हिक उरकीत असतां कोणाशीं बोलूं नये अशी शास्त्राज्ञा आहे! आतां काय करावं?

प० मु०—क्यौंबे, बोलता है या नहीं?

ब्राह्मण—( स्वगत ) बोललं तर पाहिजे आणि तें अशास्त्र तर ठरतं! आतां काय करणार? अं: पण त्यांत काय आहे. मघांशीं गायत्रीचा जप करीत असतांना दामाजीपंतांसंबंधानं नव्हते का आपल्या मनांत विचार चालले!

दु० मु०—देख पंडत, नही जबाब देगा तो गर्दन चाक करेगा!

ब्राह्मण—उत्तमे शिखरे जाते–

प० मु०—अच्छा चले जाव! हमकु उत्तमे शिखरे नही आनेका? हमकु मुजूमदारका पता लानेको जानेका है! चलो साहेब, उधर नदीकिनारेके व्हां तलास करेंगे! ( जातात. )

ब्राह्मण—बरी ब्याद गेली. आयत्या वेळेला मुसलमानी तऱ्हेचे शब्द संध्येंतच सांपडले म्हणून बरं झालं. ( पाहून ) पण हे कोण हे दोघे इकडे स्नान करून येताहेत. अरे, हा तर मुजूमदार! जाऊं दे. त्याचं तोंड नको बघणं. पण ते

मुसलमान ह्याचा कां बरं शोध करीत होते? असेल कांहीं सरकारी काम! आपल्याला काय करायचं आहे. आतां ब्रह्मयज्ञ झाल्यावर पद्मासनावर धरणं धरून स्वस्थ बसावं म्हणजे झालं. ( मुजूमदार आणि बजरबट्टू सोवळ्यानं येऊन देवळांत जातात. )

**मुजूमदार**–अरे, हें रे काय? ह्या मूर्तीच्या तीन तोंडांपैकीं श्रीशंकराच्या आणि ब्रह्मदेवाच्या नाकपुड्यांत हे गोपीचंदनाचे दट्टे कोणी मारले आहेत?

**बजर॰**–गोपिचंदनानं पोटावर अगस्त्याचीं झाडं, बंगले, भेंड्याचीं तोंडं–दंडावर बंगाली वांगीं–काढून कूर्मदृष्टि करून बसलेल्या त्या वीरवैष्णवाचंच बहुतकरून हें कृत्य असावं.

**मुजूमदार**–पण असं करण्याचा मतलब काय?

**बजर॰**–त्या जळत असलेल्या उदबत्तीचा वास विष्णुशिवाय कोणाला जाऊं नये–अन् दुसरं काय?

**मुजूमदार**–असं काय ठीक आहे. मी आतां हे सांभाच्या नाकांतले दट्टे काढून विष्णूच्या नाकांत ओल्या भस्माचे भरतों म्हणजे तर ठीक होईल ना?

**बजर॰**–ह्यांत काय संशय? पण त्या बिचाऱ्या ब्रह्मदेवाच्या नाकांतल्या दट्ट्यांची काय व्यवस्था?

**मुजूमदार**–तो तर शापदग्ध आहे.

**बजर॰**–हो. बरोबर आहे. प्रजापतिच तो. तेव्हां त्याचं एकसारखं प्रजा उत्पन्न करण्याचं काम सुरू असल्यामुळें त्याला वास घ्यायला फुरसत आहे कुठें?

**मुजूमदार**–हेंच खरं. ( पाहून ) अरे पण ते दोघे मुसलमान इकडेच कां बरं येताहेत?

**बजर॰**–येत असतील त्या पाणपोईवर पाणी प्यायला. आपल्याला काय करायचं आहे? आपलं दट्टे मारायचं काम सुरू करा.

**मुजूमदार**–करतोंच तर मग !

**बजर०**–हं बेलाशक करा.

**ब्राह्मण**–अहो शिष्ट, आतांपर्यंतचं तुमचं सर्व बोलणं मीं ऐकलं. तुम्हीं आतां उच्चारलेले शब्द जर खरे करणार असाल तर मी त्यांना खोटे करायला आडवा येणार आहें हें मात्र पक्कं लक्षांत ठेवा.

**मुजूमदार**–ही तुमची समाधी ठीक आहे बुवा! एकदां ध्यान लावल्यावर आजूबाजूच्या गोष्टींकडे लक्ष देणं हें खऱ्या योग्याचं लक्षण नव्हे. तुमची ध्यानधारणा मोठी चमत्कारिक दिसते एकंदरींत.

**बजर०**–अहो, हे बकध्यानी आहेत हें नाहीं का आलं अजून तुमच्या लक्षांत? किडा, मासा–यायचीच काय ती वाट. पुढें आलं कीं यांची चोंची लांबलीच समजा!

**ब्राह्मण**–चहाडखोराला चहाडखोर, चोराला चोर, शिंदळाला शिंदळ–असं दिसायचंच. पण पक्कं लक्षांत ठेवा–हा अस्सल ब्राह्मण जो ह्या देवाच्या दारांत दामाजीपंतांच्या सुटकेकरतां उपास काढीत धरणं धरून बसला आहे त्याचा उद्देश तुम्हीच दामाजीपंतांच्या ऐवजीं राजद्रोही ठरले जावे असा आहे.

**बजर०**–वाः–म्हणजे एकंदरींत एक पंथ और दो काज! असं हें आपलं धरणं धरून बसणं आहे म्हणतां? पण काय हो, आम्हीं राजद्रोही ठरावे अशी तुम्ही इच्छा धरण्याचं कारण काय?

**ब्राह्मण**–तुम्हीं कोण आहांत तें मी ओळखलं नाहीं असं तुम्ही समजतां होय?

**मुजूमदार**–कोण आहें मी?

**ब्राह्मण**–मुजूमदार!

बजर०–आणि मी ?

ब्राह्मण–त्याचा खाजानजी !

मुजूमदार–खूप आहांत बुवा ! साप साप म्हणून भुई झोडपणारेच दिसतां एकंदरींत ?

ब्राह्मण–सापाला पडवळ समजणारा मी नाहीं एवढं मात्र पक्कं लक्षांत ठेवा !

बजर०–चला हो–वितंड वादांत अर्थ नाहीं. स्वस्थमनानं सांभाची पूजा करूं चला.

ब्राह्मण–माझ्या विष्णुमुखाला हात तर लावा म्हणजे काय आहे तें सांगतों.

बजर०–काय सांगणार हो तुम्ही ?

ब्राह्मण–काय सांगायचं तें हात लावल्यावर मग सांगेन.
( एका बाजूनें दोन मुसलमान येतात. )

प० मु०–अरे क्या टंटा शुरू है ? अरे पकडो उस्कु. बोह देखो मुजूमदार.

बजर०–कोण मुजूमदार ?

मुजूमदार–कोण मुजूमदार ?

दु० मु०–तुम् मुजूमदार !

मुजूमदार–तुम् मुजूमदार !

दु० मु०–हम् कैसा मुजूमदार ?

मुजूमदार–हम् कैसा मुजूमदार ?

प० मु०–तुम् मंगलवेढेका कानडा मुजूमदार !

मुजूमदार–तुम् मंगलवेढेका कानडा मुजूमदार !

दु० मु०–अरे क्या तुम् दिवाना है ?

मुजूमदार–अरे क्या तुम् दिवाना है ?

प० मु०–तुमने गरीब लोगोंका बहोत पैसा खाया है. उस्के वास्ते तुमको पऱ्हेज करनेका पादशहाका हम्को हुक्म है.

मुजूमदार–हम्को हुक्म है ?

दु० मु०–काह्यका हुक्म है ?

मुजूमदार–काह्यका हुक्म है ?

प० मु०–हम् बोलते वोहि तुम् बोलते ?

मुजूमदार–हम् बोलते वोहि तुम् बोलते ?

दु० मु०–तुमारा क्या मगज बिघडगया है ?

मुजूमदार–तुमारा क्या मगज बिघडगया है ?

बजर०–अहो, हे मुजूमदार जरी खरे आहेत तरी ह्यांना सध्यां वेड लागलं आहे. ह्यांचे चाळे अजून तुम्ही बघितले नाहींत. हे हातांतच लघुशंका करून स्वतःच पितात.

मुजूमदार–( स्वगत ) काय मूर्ख आहे हो !

प० मु०–कुच् फिकिर नहीं. ये सब ढोंग मचाता है. उस्को हकीमके पास लेकर अच्छा डाग देगा.

मुजूमदार–( स्वगत ) अरे बापरे !

बजर०–डाग देण्याची कांहीं जरूर नाहीं. आमच्या दैविक चमत्कारांच्या समजुतीप्रमाणें हे इथे दत्तसेवेला आणले आहेत. हे बरे झाले म्हणजे बादशाहाकडे येतील.

दु० मु०–तुम् कौन है ?

बजर०–मी ह्यांचा स्नेही आहें.

प० मु०–तो तुम्बी बडा काफीर होगा ! अंगारखां, पकडो. यह् दोनोंकोभी लेचलो.

दु० मु०–( दोघांच्या मुसक्या बांधून ) चलो साहेब अभी ! रयतका पैका खांके गरम हुएला मगज बराबर करदेता हूं.

(ब्राह्मणाशिवाय सर्व जातात व दुसऱ्या बाजूनें **दामाजीपंत** आणि दोघे मुसलमान येतात. )

**ब्राह्मण**—अहाहा—अर्धवट ग्रहण लागलेला दामाजीचंद्र आपल्या अवशिष्ठ किरणांनीं सुद्धां मला किती सुखाचं अमृत पाजतो आहे. खरोखर—

( पंचतुंड नर रुंड० )

**अनावृष्टिनें तप्त भूमि जी झाली तिजला शमवाया ॥**
**अवचित यावा मेघ तसा हा आला मजला तोषाया ॥ध्रु०॥**
**आम्रतरूची राई खातां शलभीं परघर शोषाया ॥**
**चुकुनि रहावी एक कली जें अलिकुलास कीं पोषाया ॥**
**दामाजी नर तैसा होता खुडुनी त्याला परि वांया ॥**
**यवन—दूत हे नेती कैसे होइ नष्ट अमुची छाया ॥ ध्रु० ॥**

**दामाजी**—( प्रवेश करून )

( सुने दिल्दार० )

**मुखा, बहु गोड त्या वदरे । रमाकांता । मना, भजना करी तूंरे । सितानाथा ॥ ध्रु० ॥ अनिल विठ्ठल । सलिल विठ्ठल । धरणि विठ्ठल । गगन विठ्ठल वदे वाचा । नको चिंता ॥ ध्रु० ॥ हवा जैशी ॥ दिसत नाहीं । परी भासे । तसा विठ्ठल असे जगतीं जयत्राता ॥ ध्रु० ॥**

( ब्राह्मण पायां पडतो. )

**दामाजी**—भटजीमहाराज, तुम्हीं इथें कां? अद्याप तुमचं दुःख निवारण झालं नाहीं काय?

**ब्राह्मण**—महाराज, आपलं जें दुःख तेंच माझं. ज्या घट-केला आपण दोषमुक्त व्हाल त्याच घटकेला मी दुःखमुक्त होईन. ह्या ठिकाणीं मी धरणं धरून बसलों आहें. आपली सुटका कर-ण्याचं जर देव मनांत न आणील तर हा जीव ह्या देहापासून दूर झालाच पाहिजे. मुजूमदाराप्रमाणें ढोंग करणारा मी नाहीं हें देव जाणतो आहे.

**दामाजी**—म्हणजे काय?

**ब्राह्मण**–आतां इतक्यांतच त्याला आणि त्याच्या खजान-जीला दोघां यवनांनीं इथून कैद करून नेले. त्याचा आणि माझा केवढा तंटा झाला?

**दामाजी**–तो कशाबद्दल?

**ब्राह्मण**–मी वैष्णव म्हणून.

**दामाजी**–काय चमत्कार आहे पहा खरं पाहिलं असतां 'मुरारौच पुरारौच न भेदः पारमार्थिकः' –असं असूनही भगवंतांनीं प्रत्यक्ष अर्जुनाला असं सांगितलं आहे कीं, 'जो जो प्राणि ज्या ज्या देवतेच्या ठायीं भक्ति ठेवून, श्रद्धेनं आराधना करूं इच्छितो त्याची त्याची श्रद्धा त्या त्या देव-तेच्या ठायीं मीच स्थिर करतों!' एकंदरींत काय कीं, वेगवेगळ्या कामनांच्या योगानं वेगवेगळ्या देवता जरी अस्तित्वांत आल्या आहेत तरी, विमल ब्रह्म एकच असल्यामुळें आपापसांत तंटे-करण्याचं कांहींच कारण नाहीं. भांडण अज्ञानाच्या ठिकाणीं असतं. जो ज्ञानी आहे त्याला शिव काय आणि विष्णु काय एकच. हे जे आमच्यांत पंथ माजले आहेत त्यामुळेंच आम-च्यांतलं ऐक्य नष्ट होऊन आम्हीं दुसऱ्या धर्माचे दासानुदास झालों आहों. आमच्यांतले वीरशैव पुष्कळ बरे; पण वीरवैष्णव मोठे कठिण. जिथें शिव शब्द आला तिथे विष्णु शब्द घाल-ण्याचा जणुं त्यांनीं विडाच उचललेला दिसतो. शिंप्याकडे कपडे शिवायला टाक म्हणण्याच्या ऐवजीं हे 'वैष्णवायला' टाक म्हणतात. कोण हा विरोधभाव!

### लावणी.

**धर्म धर्म हे मुखिं वदती परि उलट कृति करिती ॥**
**हट्टी मोठे विष्णुभक्त हे नमस्कार हा त्यांजप्रती ॥ ध्रु० ॥**
**वंशलोचना काढुनि घेतां पोकळ वेळु जैं गमती ॥**
**गोरोचनविन धेनुशीर्षवच्छिवहत्त वैष्णव हे दिसती ॥१॥**

—वेदाज्ञेप्रमाणें जर आमचे देशबांधव वागूं लागतील तर आमच्यांतलं द्वैत खास जाऊन आम्हाला अद्वैताचं राष्ट्रसुख खास मिळेल. असो. भटजीमहाराज, मग कसं काय? मी पंढरपुरीं श्रीविठ्ठलाचं दर्शन घेऊन पुढें बेदरास जाणार आहें. तेव्हां तुम्ही पंढरपुरापर्यंत येताका?

**ब्राह्मण**—मी ज्या कार्याकरतां इथें धरणं धरून बसलों आहें तें कार्य आनंदपर्यवसायी होईपर्यंत इथून न हालण्याचा मीं निश्चय केला आहे. आपण माझे सर्वस्वी पालनकर्ते आहांत, पण ह्या कामांत कृपाकरून मला आपण कोणचाच आग्रह करूं नये.

**दामाजी**—ठीक आहे, तुमच्या इच्छेआड येण्याची आमची इच्छा नाहीं. पण 'सर्व विष्णुमयं जगत्' ह्याचा खरा अर्थ लक्षांत आणा; अद्वैतमताची आराधना करा आणि—

**साकी.**

**विमल ब्रह्म पूजिति वैदिक पांच पथांनीं ज्या ते ॥**
**शाक्त, वैष्णव, शैव, सौरसह गाणपत्यचि जाणा ते ॥**
**मूलस्वरुप असें ॥ द्वैता थारा तेथ नसे ॥ १ ॥**

—ठीक आहे. आपण इथेंच रहावं! आम्हीं आतां श्रीदत्तमहाराजांचं दर्शन घेऊन रस्ता धरतों. (दत्तापुढें जाऊन) दत्तमहाराज, आपलं वर्णन करायला हें माझं एक मुख कसं पुरणार? अहाहा—

(आरती भुवनसुंदराची॰)

**वर्णितां थकलि वाणिदेवी ॥ स्वरूपा अशा वर्णुं केवी ॥ध्रु०॥**
**उत्सव थोर मनीं झाला ॥ जैसा माय बघुनि बाला ॥**
**सुमाला देहवृक्ष आला ॥ अर्पितों भक्तिच्या त्या फुला ॥**
**चाल ॥ झाला दत्ता तवरे बोध ॥ त्यानें शोधित केला**

क्रोध ॥ तैसा षड्रिपुंचा तो शोध ॥ होउनि, मनिं नच येइ विरोध ॥ चाल ॥ श्रीचे पाय ॥ हीच मम माय ॥ तरुनि मज नेय ॥ म्हणुनि मी गाय ॥ कीर्ति बरवी ॥ स्परूपा अशा वर्णु केंवी ॥ ध्रु० ॥

( पडदा पडतो. )

## प्रवेश चवथा.

( स्थळ–मंगळवेढ्यांतील दामाजीच्या घराच्या समोरचा रस्ता. )

( पात्रें–सावित्रीबाई पंचारती घेऊन येते. )

सावित्री––

( प्राणपती जिवलगा फुलाचाग झेला० )

विश्वपते विठ्ठला विरामविहारा ॥ शशिकुलसुकुमारा ॥ कौस्तुभभृंगारा ॥ करि मी आगारा ॥ कृष्णार्पण मान्य करा ॥ ध्रु० ॥ कुंजवनीं राधिका रमलि तव गानीं ॥ तैसी मी भजनीं ॥ ब्रीद ठेवोनी ॥ ये हरि धांवोनी ॥ सुख दे पति रक्षोनी ॥ ध्रु० ॥

( ऐकून ) ज्यानं आम्हांला हें घर दिलं त्याच भगवानाला हें परत देण्याचा जो हा आज मला आनंदाचा योग आला आहे त्या अशा आनंदाच्या वेळीं आपण रडून मला अपशकून करण्याचं धारिष्ट कोण करतं आहे ? ( पाहून ) अग बाई, ह्या तर मुजूमदारांच्या पार्वतीबाई ! ह्या कां अशा रडत इकडे येताहेत ?

पार्वती–( पडद्यांतून म्हणत येते. )

( कोइ सुनो मेरि फिरियाद० )

सर्वस्वीं मी बुडलें ॥ दुर्दैवें मज संकटिं लोटियलें ॥ करुं काय ॥ मनिं धाय ॥ हाय हाय ॥ ध्रु० ॥ राजानें मम पतिला धरुनीं राजपुरीं नेलें ॥ मागुति इथलें घर तें सारें दूतांकरिं लुटिलें ॥ नच माय ॥ नृपराय ॥ हाय हाय ॥ पार्वतिरमणां समुळीं तोडी त्रिशुलीं अरिचि कुलें ॥ वाहिन तुजला रोज लक्ष मी नाजुक बिल्वदलें ॥ मनिं धाय ॥ करुं काय ॥ हाय हाय ॥ ध्रु० ॥

**सावित्री**–पार्वतीबाई, काय झालं? रडतां कां अशा?

**पार्वती**–अहो तुमच्या यजमानांच्याप्रमाणें इकडेही धरून बेदराला नेलं. आन् आतां बादशहाचे शिपायी येऊन त्यांनीं आमचं घर लुटलं. मला अशी ही एका वस्त्रानिशी बाहेर काढली. दारांत चौकी पहारा बसवला आहे. मला घरांत राह्यचीसुद्धां परवानगी नाहीं.

**सावित्री**–अहो कोणाचं घर नि कोणाचं दार?

**पार्वती**–अहो कोणाचं म्हणजे आमचं? असं काय म्हणतां?

**सावित्री**–पार्वतीबाई, मोह मोठा निलाजरा आहे. अंगावर बसणाऱ्या माशीला ज्या वेगानं दूर लोटावी त्याच वेगानं ती जशी परत येते तसा हा मोह मोठा लोचट आहे. त्याला मनाच्या निश्चयानं नाहींसा केला पाहिजे. ह्या जगांत आपली वस्ति वानरांच्या निश्चयासारखी अशाश्वत आहे. म्हणून व्यर्थ खेद करण्यांत अर्थ काय? सौख्यच जर मुळीं लटकं तर असेल ती स्थिति बरी नव्हे का? मीं हें घर आतांच कृष्णार्पण केलं. आतां ह्याचा माझा कांहीं संबंध राह्यला नाहीं.

**पार्वती**–घरावर तुळशीपत्र ठेवून तुम्हीं जाणार कुठें आतां?

**सावित्री**–अहो कुठें म्हणजे—

( वेदशास्त्रा नाहीं ठावा० )

पंढरपूरीं प्रेमें जातें भेटाया विठ्ठला ॥ ध्रु० ॥
सुदर्शनाचा फेरा तेथें चारी प्रहराला ॥
पंढरिनाथा रिझवुनि मन हें मिळविल मुक्तीला ॥

**पार्वती**–मुक्ती तेथें कैशी मिळते दावा ती मजला ॥
**सावित्री**–मज संगें तुम्ही यावें सोडूनी मोहाला ॥
**पार्वती**-येतें बाई धरुनी प्रेमें हरिच्या भक्तीला ॥
**सावित्री, पार्वती** –पंढरपूरीं प्रेमें जातों । भेटाया विठ्ठला ॥ ध्रु० ॥

( एकमेकींचा हात धरून जातात. )

अंक चवथा समाप्त.

# अंक पांचवा.

## प्रवेश पहिला.

[ स्थल-बेदरच्या बादशाहाचा दरबार. हुमायुनशहा ब्राह्मणी, वजीर, काजी, सरदार, खुष्मस्कऱ्या, भालदार नाचणाऱ्या व गाणाऱ्या स्त्रिया, वगैरे. ]

भालदार--

पाक् परवर दिगार् । शुक्रे मौलाके कमाल प्यार् । और् नेहायत हजार बार् । हुजूरके समसेरसे दुष्मन् हुए बेजार । बद्जाद् बने बेमार् । चमन्मे चिडिया पाद्शाहा हुमायूनशहा तशरीफ लाते है ॥ गरिबन्नवाज् पादशाहाकी दौलत उमर बढती है । रियासत्को खुदा परवरीष करता है । दुनिया दुरोझेका मालिक् नाहिंजारको गारद् करदेता है । तन्दुरुस्तीकी चमन् चष्म्रोषन् चली है । सबोंके आदाबपर निगा रखीये मेहेरबान् ।

( भालदाराच्या शेवटच्या ललकारींत बादशाहा येऊन तख्तावर बसत असतां सर्वांचे मुजरे घेतो व स्त्रियांचें गाणें सुरू होतें. )

सर्व स्त्रिया-( पुढील पद्य म्हणतात. )

( सुरूप शालिनी. )

नरेंद्रकीर्तिला ॥ सुरेंद्र भाळला ॥ सुरांगना सुखासना त्यजूनि पातला ॥ सुरांबरीं पहा ॥ सुपुष्पहार हा ॥ करिं धरूनि सुखवरूनि अर्पिण्या तुला ॥ त्वदीय कौतुकीं ॥ तो सुरवरेण्य कीं ॥ पहा पहा सुमौन पावला ॥ १ ॥

(हें पद्य म्हटल्यावर नाच सुरू होतो व नाच संपल्यावर बादशाहा बोलूं लागतो.)

बादशाहा-बेहेरे खुदाके मेहेरनझरसे सब् कारवाई अच्छे तऱ्होंसे चली है. लेकिन् इस् मरेठा परीयोंका इस्से जियादा नाच और गाना हमे नाखूष बनायगा. इस् लिये, उन्कों ह्यांसे

एक्दम् जाने दो. (नाचणाऱ्या स्त्रिया जातात.) आज: दसपांच रोज हमारे दिल्को बहोत् चमन्की खूषी पैदाकरनेवाली, वोह् नाजनी परी, इस् जमीपे–अस्मानकेमुजब चमक्नेवाली बिज्ली–औडा नायकन् कहां है? उस्को ले आव! उस्को मुसलमीन बनाके, गोशेमे रख्देनेका इरादा हम्ने किया है. क्यौं काजीसाहेब, अम्ने कौम्का हमे हुक्म मिलेगा ऐसा अरमान रख्ताहूं!

**काजी**–गरिबन्नवाज्, आपके मर्जी मुआफ्क्–आप बनालेएंगे–इस्मे षख् नहीं. नौमुरीद्से सच्चा लोही अच्छा! महमदी दीनमे पैदाष हुई है ऐसी लुगाईके साथ शादी करना–हुजूर्के सरिखे अल्लाहुतालाके मुजूसम्को बेषख् है. चाहे उस् धरमका इन्सान महमदी धरममे आसक्ता है! लेकिन् खान्दान्का खून् उस्के बदन्मे पैदा होता नही!

**बादशाहा**–बात् सच्! लेकिन् जैसे बिचार वैसी वझे बन्ती है! क्यौं वझीर, इस् बारेमे तुमारी रुघ्बत् क्या है!

**वजीर**–हुजूरेआलि, इस् बारेमे कुई अझीने जो खास आपकी ख्वाएष बतानेका जोखन् किया तोभि आपको उस्की राय बेवखूब् मालुम होके मुम्कीन् नही होगी. ऐसा है तोभी मेरी ख्वाएष् साफ् बोल्देताहूं के, गनीम्के हिंदु धरम्की औरत जिस्का धंदा रंडीका है–उस्को मुसल्मीन् बनाके, खुद् पादशहाने उस्को बीबीजान् मुज्ब मेहेल्मे रख्देना बिल्कुल् मुम्कीन् नही. गोया सल्तनत् पादशाहाको–लाखो औरतां–मुसलमानी धरममे–एक्से दूसरी बढकर खुबूसूरत–उमरलायक्–नाज्नी परीयोंकों आप्ना शक्ल् नीचे करदेनेका हुक्म करनेवाली मिलेंगे.

**खुषमस्कऱ्या**–हां हां बेषख् मिलेगी! मुर्गा एक लेकिन् मुर्गी बहोत्! पीकदानी एक् और उस्मे पिचकारी मारनेवाले

जैसे बहोत ऐसीही बात औडाकी है? एक पिक्दान सबूको बनाता नादान! उस्के लिये लेकर पानदान, तमाखू खाते है सैतान, और थुंकनेके वास्ते सब लेते है उस्को नजीक जैसे दोस्तान. और बडे उफ्लतसे उस्के मूंमे आम्रा मूं ठूंसकर, बन्ते है लाल् जैसे चिराक्दान्!

**बादशाहा**–काह्यके लिये?

**खुषमस्कऱ्या**–आप् क्या समजते हो बोसालेनेके लिये?

**बादशाहा**–आय् गव्हार!

**खुषमस्कऱ्या**–मैहूं लाचार!

**बादशाहा**–तो फिर् मन्का मायना करदो बहार!

**खुषमस्कऱ्या**–उस्के मूंमे थुंकनेकी होती है बडी बाहार!

**काजी**–सच है के वोह् रंडी करदेइंगी ऐसाही कहार!

**खुषमस्कऱ्या**–उस्को न मान्ते जहार, वोह् बन्गयी है पादशहाका गलेहार!

**वजीर**–क्यां कहूं बार बार–वोह् नाहिंजार हुजूरको बनाके यार करदेइंगी बेकार!

**खुषमस्कऱ्या**–क्या कहूं उस्का कारभार, के वोह पिक्दान् वैसीही रह्यती है नेकनामदार.

**बादशाहा**–अबे खामोष् नाहिंजार! क्या, सब् बन्गये है बेदरकार बेमान? जिस्के मगज्मे नही है आह्यसान्, वोह काह्यका इन्सान्?

**खुषमस्कऱ्या**–उस्केही लिये बन्के नादान–वोह् पिक्दान् इन्सान् होते है आज्काल् कुर्बान्!

**बादशाहा**–क्या तूं है बेगुमान् हैवान्?

**खुषमस्कऱ्या**–हुर्जेनगीषे आलिम्–मैहूं बागवान्!

**बादशाहा**–कहां है तेरी गुल्जार करो बयान्!

**खुषमस्कऱ्या**—इस् उर्झका मै हूं बागवानके जिस्का नही अरमान! क्यां करूं बयान्, लेकिन् हुजूरके वास्ते फूलोमें फूल और गूलोमें गुल्—इत्नाहि नही तो इस सब गुलिस्तानका गुल् आब—के जिस्के फंदेमे गिरफ्दार होके आप् बने हो दरबारमे बेजबाब—वोह् आपका औडा गुलाब्—

**बादशाहा**—( सिंहासनावरून उठून ) कहां है जल्द दे जबाब!

**खुषमस्कऱ्या**—वोह् देखो आबखसे भरी हुई, आरही है, जैसी नबाब!

**बादशाहा**—अब खूषीसे खिलाउंगा तुज्को कबाब!

**खुषमस्कऱ्या**—बंदगी उठाताहूं सल्तनत् साहाब.

( आवडा पद्य म्हणत येते. )

**आवडा**—

( मोरे संयानें गालिदिनि० )

नेलें नृपानें हारपुनि मानस जें ॥ काढियलें मीं
शोधुनि तें ॥ ध्रु० ॥ कवि हो चोरी जैं वस्तुप्रकृति
तैं ॥ नृपमन मन्मनहारक तें ॥ ध्रु० ॥

सल्तनत् पादशाहाकी बंदगी उठातीहू?

( जिल्हा—दीपचंदी )

**बादशाहा**—कहेना सुन मान जान ॥ तेरा दिल मारा ॥
प्यारा हुवा है ॥ ध्रु० ॥

**आवडा**—पहिले बचनसे ध्यान मानले ॥ फिर् तनमन करुंगी
मै कुर्बान् ॥

**बादशाहा**—बुलबुलको खूषीसे देऊंगा चाहेसे ॥ तनको
लिपटो जान् ॥

**खुषमस्कऱ्या**—वाह वा ॥

**आवडा**—गमूख्वार् गमूख्वार् ॥

**बादशाहा**—तूंही है मेरि जान् ॥ ध्रु० ॥

**बादशाहा**–आय् मेरी प्यारी जरा करेगी इन्तजारी तो अलबत् कसमकी बात करूंगा पूरी, लेकिन् मत् कर गमूख्वारी.

**आवडा**–आय् दिल्, मत बन् गाफिल्. चाहे उधर हिल् लेकिन् कम् दिल्से मत् मिल्.

**बादशाहा**–इन्तजारी बेकरारी जुज्मगो. हम् तुमारे होचुके तुम् हमारे होनहो.

**आवडा**–वल्ला, क्या अजायब् मजा है? क्या वजेदारी है? और कैसी आषखूकी गुफ्तारी है? सचा प्यार वोहि है के बेहेत्तर छल्बल्के खाक् होना! मगर दोनों साथ्–और के हाथ-अगर्चे सरपे लाथ–हाय हाय! काटोंसे बदन् भराहुवा और दिल्दार यारके प्यारसे दिल् दिवाना–नहीं–निशाना होगया!

**बादशाहा**–प्यारी, जो करता है दिल्दारी उस्कोहि आषखकी जखम होती है भारी. जिस्को नहीं हिंम्मत् वोह् क्या करेगा मोहबत्! ( पाहून ) लेकिन् वोह् देखो! जरा तूं वहां बैठ जा! आई ये–आई ये बद्माष! ( मुजूमदाराला कैद केलेला घेऊन येतात. ) आय् षैतानकी सूरत, खूब् है तेरी मूरत्! रयत्का पैका खूब् खाकर बन्गया है बेकदर! कैसी थी तेरी मादर् के जिन्ने पैदा किया ऐसा फर्जंद सुव्वर बहादर!

**प० शिपाई**–गरिबन्नवाज, हुजूरको अर्जकरताहूं के यह् अभ्री बिल्कुल् दिवाना होगया है! रास्तेमे उनोंने दिवानेकी बहोत मशीगफी किया. उसेसे अंदाज् होता है के वोह् बराबर दिवाना होगया है!

**आवडा**–काय, यांना वेड लागलं आहे म्हणतां? हकीमाकडून डाग द्या म्हणजे आतां बेतावर येतील!

**बादशाहा**–हमारे दिल्जान्का कह्यना बराबर है!

**मुजूमदार**–( स्वगत ) काय, ही ह्याची दिलजान् झाली?

बरोबरच आहे ! शेंदरी कैरी–मग ती कृत्रिम असो अगर स्वाभाविक असो–वाटेल त्याचं मन आपल्याकडे ओढणारच.

**आवडा**–बरं, ह्यांना वेड लागलं आहे! अन् ह्यांचा तो हरामखोर सल्लागार बजरबट्टू कुठें आहे? त्याला कां नाहीं कैद करून आणला?

**बादशाहा**–क्यौंबे–बेवकूफ्, उस्को काह्यको नही गिरफ्दार् करके लाया?

**दु० शिपाई**–हुजूरेआलि, वोह् बजरबट्टू बडा अकल्मंद! रास्तेमें पानी पीनेको नदीमें गया और उधर जलमे एक्दम बिजलीसरीखा गहिब् हुवा. तलास तो बहोत किया; लेकिन् कहांभी जल्में नजर् नहीं आया?

**आवडा**–शर्थ आहे त्याच्या अकलेची!

**बादशाह**–क्या बोलताहे? गहीब हुवा? ऐसा कैसा गहीब हुवा? क्यौं मेरी प्यारी, वोह् क्या जादूगार है?

**आवडा**–जादूगार उस्के साम्ने क्या हातचालाखी करेंगे? आच्छा आम्हीको वोह् दिवाना बनायगा–ऐसा बडा पागल् है! उस्केहि मदतसे–आजदीन्तख्–वोह् खडा है जैसा लाचार हरामखोर कानडा मुजूम्दारने पैका खानेकी कारवाई चलाईथी!

**मुजूमदार**–( स्वगत ) काय हलकट रांड आहे हो? खरं पाह्यलं असतां हिनंच प्रथम मला ह्या पैसा खाण्याच्या व्यसनांत घातलंन! असं असतां–चोरून मध खाणाऱ्या लुटारू भ्रमरी प्रमाणें पुन्हां आपली साव बनून बसली आहे!

**बादशाहा**–क्यौंबे दिवाना, तेरा मगज लेता है आम्रा ठिकाना, के जुरूर है उस्को हकीमसे डाग देना? आज्तक् लुटवाया है तूने जित्ना खजाना, वोह जल्द लाके देना,

नही तो जल्बल्के खाक् होजाना. अय् पलीद, सून्ता है क्या गर्दन नीचे कर्कर्? बोलता है जल्द के चढाऊ सर्गस्के वास्ते गधेपर्?

मुजूमदार—

( वनके तवंगर० )

फेरव फेंफ फेनिल फेंफें फेलिक फेंफें फेंफेंफें ॥ फेटकार फें फेणाशन फें फेरुधि फें फेंफेंफरि फेंफें ॥ फेरंडा फें, फेण-पिंड फें, फेणगिरी फें, फेंफेंफें ॥ फें फस फेंफें, फें फण फेंफें, फें फक् फेंफर, फेंफेंफें ॥ फें फल फेंफें, फेंफर फेंफें फें फुल फेंफें, फेंफेंफें ॥ फेंखर फेंधन फेंमन फेंबल फेरफार फें, फेंफेंफें ॥ फेंसल्ला फेंमल्ला फें ॥ फें सकलांफें फेंफेंफें ॥ १ ॥

बादशाहा—अबे नफ्फर, रयतका पैका खाकर होगया है तू गबर, और फेंफें करता है उपर, ये मै खूब जान्ता है आखर-लेकिन् हकीमसे तुज्को डाग देकर, लाता है तेरा मगज ठिकाने-पर, इस्का मन्मे सोंच कर.

मुजूमदार—फें—फेंफेंफें—फें!

बादशाहा—क्यौं वजीर, उस्के फेंका मायना क्या है?

वजीर—हुजूर, उनोने मुखूसूस्के लिये खायेला रिश्वत हजम करनेके लिये यह फेंकी तरकीब निकली है ऐसा मै अंदाज करताहूं.

खुष्मस्कऱ्या—अंदाज सच्! उनोने पैका खाया सच्! हुजूरके दिल् जान् औडीने आखरके वास्ते गवाहीके लिये उस् मुजूमदारका कलमबहादरीका पुरावा लाया है वोहि सच! तुम् सच् हम् सच्! ऐसा है तो उस्का फें काह्यको नही सच्? ( एक शिपाई येतो. )

**शिपाई**–हुजूरे आलि, दामाजीपंत ठाणेदारके तरफ़्से कुइ विठु नामका महार बाहार आया है. उनोने यह खत दिया है.

**बादशाहा**–वजीर, इस्मे क्या लिखता है वोह नमकहराम–बेवफादार दामाजी ?

**वजीर**–सरकारी अनाजके जो कय्येक तहखाने रयतसे लुटवाये ऐसा हुजूरको जाहेर हुवा है वोह् बात झूट है ऐसा यह खत सिखाता है.

**बादशाहा**– तो क्या उनोने अनाजके कोठार रयतसे नही लुटवाये ?

**वजीर**–लुटवाये यह बात तो सच्, लेकिन्–कुल् तहखानेमे अनाज कित्ना खंडी था उस्का हिसाब् हुजूरके दफ्तरमे जाहेर है. उस्का दाम उस् दामाजीने इस् हालके निरख मुजब् हुजूरको पोंचानेको भेज दिया है.

**बादशाहा**–हमारे खजीनेसे–हमारे भूकेबंगाल रयत्के लिये हम्ने पचास हजार आश्रफी भेज दियीथी उस्का क्या हुवा ?

**वजीर**–औडीके मदतसे–मुजूमदारने उस्की बहोतही अफ्रातफर किया उसके लिये रयत् बेजार् हुयी और हुजूरकी नामोषी करने लगी. यह् बात् दामाजीको नापसंत होनेसे उनोने हुजूरकी नेकनामी बढानेके लिये सब कोठार रयतको खूले करदिये. अब् रयत बहोत खूषी है !

**बादशाहा**–और उस् अनाज्का दाम उनोने कहांसे भेज् दिया ? उस् अनाज्की कीमत कुछ थोडी नही होगी ?

**शिपाई**–लेकिन् उस बिठु माहारने साथ लायी है जो आश्रफीकी थैली वोह् तो इत्नीसी छोटी है !

**बादशाहा**–बुलाव् उस्को रूबरू ! ( शिपाई जातो. )

**मुजूमदार**–( स्वगत ) काय असेल बरं हा चमत्कार! पण

ह्यांतल्या ह्यांत एक बरं झालं. आवडीच्या मदतीनं मी पैसे खाल्ले असं त्या पत्रांत आहे. आतां पहावं काय होतं तें.

( विठुमहार येतो. )

विठू--

जोहार मायबाप जोहार ॥ पर्‌जेमंदी भुकेचा वाल्डा लै कार ॥ म्हुनशानी दामाजीपंत ठानदार ॥ आपली पर्‌जा पगून जाला बेजार ॥ आपली कीरत डुबती येचा विचार ॥ करूनशानी केला त्येनं कारभार ॥ जोहार० ॥ आम्ररुक्श जाना उदार ॥ त्येवी त्यो ठानदार ॥ हुजूरचा नोकर इमानदार ॥ सरकारच्या हुकमाबिगार ॥ त्येनं लुटावलीं कोठारं धान्याची पार ॥ त्येपायी सरकारचा त्यो गुन्हेगार ॥ राजद्रोही ठरला अपरंपार ॥ पन धान्याचं दाम घ्या हे मोजून नग्द सरकार ॥ जोहार०॥

बादशाहा–अबे तुम कौन है ?

विठू–मी मंगळवेढ्याचा येसकर है !

बादशाह–वजीर, दाम् गिन्के लेव. पीछे उस्को असल् शिक्केकी मोहरबंद रसीद देव. और दामाजीपंतको कैदसे छोडनेका हुक्म् छोडो.

वजीर–जैसी हुजूरकी मर्जी.

बादशाह–क्यौं काजीसाहाब, यह विठुमहारका इन्सान कौन्से तरकीबका आप्के नजर आया ?

काजी–महारलोक वैसेही रह्यते है !

बादशाहा–मन्में पूरा सोंच करो. आप्नेही हम्को एकदफे सुन्वाया है के–

खालिक्ने क्या बनाई है सले आला नमाज़ ॥
अंधेर था जहांमे नहोती अगर् नमाज़ ॥

काजी–हां–यह शेर तो बराबर है ? लेकिन् वोह् अभी पढनेका मौका कौन्सा है ?

**बादशाहा**–यह बिठू महारको देखतेही मेरा मन् उस्के कब्ज होगया. हिंदुओंका शुक्र हुताला वैसाहि है ऐसा मै जान्ता हूं. उनोने आज हम्को दर्सन दिया–उस् लिये मै तहाजिंदगी उस्का ताबेदार होने चाहता है! ( वजीर येतो त्यास ) क्यौं वजीर, आश्रफी गिन्के लिया?

**वजीर**–बडी अजायब तौर होगई के, रुपय्यांकी थैली इत्नी छोटी–और उस्मेसे जो दाम निकले उस्का ढिगारा इत्ना बडा होगया! पहिले मै समजा के वोह जादूगार है. एकदम् वोह् रसीद लेकर निकल्गया. पीछे दोदफे मैने रुपया गीन लिया तो बराबर.

**बादशाहा**–क्या, वोह् निकल्गया!

**वजीर**–मेरा कह्यना सच है!

**बादशाहा**–कुइ जवान् भेजकर् उस्को लेआव!

**वजीर**–अय् चपरासी, जाव–उस्को लेआव. (चपराशी जातो.)

**आवडा**–हुजूर, इस् मुजूमदारका खजान्जी बजरबट्टू नामका जो मैने कहाथा–वोहि वोह् बिठु महार बन्गयाथा ऐसा मुजे शख् आता है!

**मुजूमदार**–( स्वगत ) हा माझा बजरबट्टूच खास!

**चपराशी**–( पुढें येऊन ) दस पांच सवार भेजकर तलाश किया लेकिन उस् बिठूका पता नहीं!

**बादशाहा**–उस्का अभी पता लगनेका नहीं. मै बडा कम् तख्दीर. मेरे दरबारमे हिंदूका देव आया और मुज्को दर्सन देके एकदम् निकलगया! दोस्त दामाजी, क्या तेरी कुदरत् के तेरे वास्ते खुद्बखुद् अल्ला अफ्लागमेंसे आता है तेरी बंदगी उठानेके लिये. अय खुदा, तूंहि बिठू है! तेरी खिलखत् कौन जाने?

तुंहि है बादशाह् हर दोजहाका ॥ तुंही है रव्जमी और अस्मान्का ॥ या इलाही तेरा दर् छोड कहां जाय गरीब् ॥ बादशाहीसे तो बेहेतर है गदाई तेरी अजब् ॥

**काजी**–अजफल्की कद्रखाको आलाके साम्ने, कुवा कभी न लेहेर्के दर्याके साम्ने!

**आवडा**–काजीसाहाब्का कह्यना सच् है! वोह् बजरबट्टू था! वोह् हिंदूका देव कैसा होगा!

**बादशाहा**–अय तवंगर, बेतमीज–क्या मेरेको सिखाती है हरगिज्? बंदकरदे तेरी जबान्–बस् हुवा तेरा नखरेका दोस्तान्! उस् खत्मे क्या लिखाहै? मुजूमदारको पैका खानेको मदत तूने किया है या नहीं? कौन है रे–वजीर, हम् उस्के फंदेसे बहार होगये है. उस् खत्मे जो कुच्छ लिखेला है वोह् सब् बराबर है! उस्को एक्दम् गिरफ्दार करो. और जिस् दामाजीके वास्ते उस्के भगवत् विठ्ठलजीने हमको दर्सन दिया उस्को मिलनेको हम् जाने चाहताहै! इस् मुजूमदार और उस्की यह् पागल औडा दोनोंकोभी हमारे साथ लेचलो.

**काजी**–हुजूर, बिचार करो! आप कहां जाते हो! फत्त-रकी पूजा करनेवाला वोह् दामाजी आपको क्या देगा?

**बादशाहा**–इस् बाबतमे—

चातुरसे चतुराई करे और मूरखसे कुछकाम नही ॥
क्या उसे बेपार करे के जिस्के गाठीमे दाम नहीं ॥

( बादशाहा एकदम निघून जातो. )

**काजी**–हमारा धरम महमदी, दामाजीका हिंदी! वोह् क्या बताएगा हुजूरको अल्ला के जिस्का बदन है काला? मगज् बिग्डा हुवा इन्सान, बन्ता है जैसा सैतान! हुजूरकी मूरत बनी है जैसी दिवानेकी सूरत! अभी जाकर उस्को देऊंगा हमारे

कौमका मश्वरा, फिरगया उस्का दिल् बिचारा, तो नसीब हमारा? नहीं तो बुढेपन्ने मुज्को दिया है जो घेरा, इस्को बेहुर्जत होनेसे पकडुंगा मै दोजख्का किनारा! ( जातों. )

**वजीर**–क्यौं–बंदर्की सूरत औडाजी, अब्बी क्या है तेरी मर्जी, बनगयीथी गाजी, लेकिन् कैसी ठैरगई अभी पाजी?

**आवडा**–सब्रोंके तख्दीरका सितारा ऐसाहि है!

**वजीर**–जियादि बात् मत् करो! जैसा किया वेसा अभी भरो! चपरासी, उस्को लेचलो? ( जातो. )

**आवडा**–खरंच, दैवाची गति मोठी विलक्षण असते.

( पंखा फुलनका० )

**करी खेळास, देइ उल्हास ॥ अज्ञान नशीबाचें ॥ म्हणुनी त्या वंदन नच जाचे ॥ चित्रपथिं त्याला ॥ सौख्यें किति भोगिला ॥ मी मळलें त्यांतचि नशिबाला ॥ गिरिसौख्याचा दैवें जो दिधला ॥ झटकर त्यानें तो नेला ॥ राहिलें अबला ॥ सुदया करि धरिरे तुझे ते धन्य पाय अबला ॥१॥**

( चपराशासह जाते. )

**मुजूमदार**–( स्वगत ) ही आवडी आतां बोलली तें खोटं आहे असं कोण म्हणेल? मेंढरांनीं आपलीं तोंडं जमीनींत खुपसलीं म्हणजे पाऊस क्षणार्धांत पडलाच पाहिजे हें जसं खरं आहे तद्वतच राजेलोकांच्या मनांत एवढासा घुस्सा घुसला कीं, प्रेमाश्रितांच्या सुद्धां डोळ्यांतून दुर्दैवाचा पाऊस पडलाच पाहिजे. ही आवडीच ह्याचं प्रत्यक्ष उदाहरण आहे. हें असो; पण तो मघांचा विठु महार! त्याला बघितल्याबरोबर––

( धाडुनि दिधलें० )

**पाहुनि त्याच्या वदना पडला मोह अती चित्ताला ॥ स्मरणपुटीं ह्या जागृति झाली ओळखिलें गतकालाला ॥ ध्रु० ॥**

**ओळख पटली ॥ मति ती नटली ॥ देव रूपिं कीं जडली ॥ मन्मन वदतें ॥ विठ्ठल होता ॥ मम गृहिं तो सेवेला॥ १॥**

–रस्त्यांत तो नदींतच नाहींसा झाला. तरी मला त्याची ओळख पटली नाहीं; पण मनोमयसाक्ष म्हणून जें एक तत्वज्ञान्यांचं तत्व आहे त्याची मला आज ओळख पटली! माझ्या घरीं बजरबट्टूच्या वेषानं देवाला राहण्याचं कारण–दामाजीपंतांचाच भक्तिभाव यांत कांहीं संशय नाहीं. देवा, दामाजीपंतांकरतां रसद भरून त्याला जसा राजद्रोहांतून मुक्त केलास तसा मला ही करण्याची कांहीं युक्ति काढ. तूं युक्तींचा सागर आहेस. माझ्या पापीवर्तनाचा दुर्गंध तुझ्या सिंहासनापर्यंत पोंचला आहे. तेव्हां आतां तुझ्या कृपागंधानं त्याला शुद्ध करा.

**चपराशी**–क्यौं, वेडा फकीर, क्या चलाहै मन्में?

**मुजूमदार**–फें–फेंफें?

**चपराशी**–चलो अभी जिंदानमे फेंफें करतेहि पडो.

**मुजूमदार**–( बनके तवंगर० ह्या चालीवरील–मागील वड्याचें 'फेंफेंचें' गाणें म्हणत असतां पडदा पडतो. )

---

## प्रवेश दुसरा

[ रानांतील रस्त्यावर **बजरबट्टू** पहिल्याच वेषांत येतो. ]

**बजर०**–दामाजीसारख्या विभूती तयार करून त्यांच्याकडून–ह्या काळकूटानं भरून ठेवलेल्या भवसागराच्या पार पोहून जाण्याची कला–कालांतरानं पुनःपुन्हां धर्मजागृतीकरतांच जन्म पावते. हा बजबट्टूचा देह काय किंवा मघांचा तो विठू महाराचा काय? एकच! आत्मा हा भोगी असल्याकारणानंच तो ह्या पंचमहाभूतात्मक निर्जीव वस्तूंना आपल्या संगतीनं सजीव बनवतो. उपवनांतल्या लतागृहांत विहार करणाऱ्या जनांप्रमाणें ह्या देहांत तो विहार करतो; कंटाळा आला म्हणजे हें देहरूप

लतागृह सोडून तो दुसऱ्या लतागृहांत जातो; प्रत्येक सहवासाच्या संगतींत त्याचा जो उद्देश असतो तो सफल होईपर्यंत त्याला त्याच ठिकाणीं राहावं लागतं. ह्या देहांतल्या आत्म्याची गोष्ट हीच आहे. ह्या देहमंदिरांतला आत्मा जर दामाजीपंतांच्याच घरीं त्यांच्याच सेवेला राह्यला असता तर दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांचा मुजूमदारानं खाल्लेला पैका ज्यांचा त्यांना परत मिळाला नसता. विपत्तीनं गराडा दिला असतांही लोकनायक धीराचे कसे धरणीधर असतात ह्याचंही उदाहरण मग दाखवतां आलं नसतं. एकंदरींत काय कीं, दुःखपर्यवसानाचा स्पष्ट शेवट विठुमहाराच्या मुंडासाकामळ्यानं अस्पष्ट केला. आणि त्याच्याच अजब थैलीनं तो आनंदपर्यवसानाचा होणार असं बेदरच्या दरबारांत केव्हांच ठरलं. तेव्हां आतां ह्या देहाच्या संगतीचं ह्या आत्म्याचं कारण संपलं. आतां हा निजधामाला जाणार; पण सबंद नाटकाच्या सूत्रांपैकीं एक सूत्र अद्याप पीळ देऊन भक्कम करायचं राह्यलं आहे—तेवढं केलं कीं, ह्या रंगभूमीवरचं ह्या पात्राचं काम संपलं. तें सूत्र कोणचं—तर हें पहा-तें इकडेच येताहे. ( एक प्रवासी येतो. )

**प्रवासी**—अहो वनचर, बेदरचा हाच का रस्ता?

**बजर०**—वनचरापेक्षां मला खेंचर म्हणवून घेतलेलं फार आवडतं. तें असो म्हणा. पण कायहो, तुम्ही ह्या अशा भपकेबाज् पोशाखानं बेदरास नोकरीकरतां चाललांत वाटतं?

**प्रवासी**—अहो, मी घरचा चांगला सुखी आहें; मला नोकरीची मुळींच जरूर नाहीं. मंगळवेढ्याला मुजूमदार म्हणून बेदरच्या बादशाहाचे जे अधिकारी आहेत——

**बजर०**—अहो, आहेत कसले? होते म्हणा!

**प्रवासी**–म्हणजे, तुम्हांला त्यांची माहिती आहे वाटतं?

**बजर०**–हो हो! अहो मी जर त्यांचा सख्खा मावसभाऊ त्यांच्याच जवळ होतों तर मला त्यांची माहिती कशी नसेल?

**प्रवासी**–म्हणजे? तुम्ही कोण? त्यांना मी जसा एकटाच मावसभाऊ आहें तसे तेही मला एकटेच आहेत.

**बजर०**–तुमचं नांव काय?

**प्रवासी**–माझं नांव रंगराव असं जरी आहे तरी मी बजरबट्टू ह्या नांवानंच प्रसिद्ध आहें.

**बजर०**–काय म्हणतां? तुम्ही बजरबट्टू आणि मी कोण?

**प्रवासी**–मला हो काय माहीत!

**बजर०**–असं काय? ठीक आहे! पाहून घेतों आतां!

**प्रवासी**–ह्याचा अर्थ काय बुवा?

**बजर०**–तें पहा–तिकडून बादशाहाचं लष्कर येताहे–तेंच तुम्हाला ह्याचा अर्थ सांगेल! ते पहा–मुजूमदार त्याच लष्करांत त्यांच्या आवडा रांडेसह कैदी होऊन इकडे येताहेत. शिवाय, त्यांच्या सर्व नातेवाईकांना पकडून कैद करण्याचा बादशाहाचा हुकूम सुटला आहे! बोला तर मग–तुम्हाला अशा स्थितींत बजरबट्टू ह्याच नांवानं ह्याच पोशाखांत राहणं बरं वाटतं–का माझ्यासारखा विचित्र पेहराव करून नव्या नांवानंच सचोटीनं मिरवावंसं वाटतं?

**प्रवासी**–माझ्या भोंवतीं हें तुम्ही मोठं लचांडच आणलंत बुवा! पण खरं सांगा–तुम्ही कोण?

**बजर०**-मी होतों मुजूमदारांचा खजानजी! तेव्हां मलाही त्यांच्या बरोबर कैद केलं; पण चमत्कार असा कीं, काय झालं असेल तें असो, मी आपला एकदम बंधमुक्त झालेला ह्या रानांत आलों–तों एका झाडाखालीं मला हे कपडे सांपडले.

मनांतली भीति घालवून छद्मवेषाला साखसूरतपणें भटकायला हे कपडे बरे आहेत अशी मनाची खात्री झाल्यामुळें–हे मीं घालून–आज पंधरा दिवस भटकतों आहें, पण कोणाची छाती होत नाहीं मला ओळखायची! बरं येतों आतां!

**प्रवासी**–थांबाहो–मलाही अशीच एखादी युक्ति सांगाना?

**बजर०**–छे:–जमायची नाहीं. जाऊं द्या मला. ते पहा–मुसलमान शिपाई इकडे येताहेत. खुशाल त्यांना आपलं मुजूमदारांचं नातं सांगा म्हणजे चांगलं इनाम मिळेल.

**प्रवासी**–असं हो काय करतां? माझी कांहीं तरी व्यवस्था लावा अन् मग जा.

**बजर०**–ठीक आहे. त्या शिपायांनां सांगतों तुम्ही कोण आहांत ते–म्हणजे ते तुमची अगदीं बरोबर व्यवस्था लावतील.

**प्रवासी**–अहो, गळ्याशीं आलं तरी अशी थट्टाच काय करता? तुम्ही सांगाल तें मी ऐकेन अन् त्याचप्रमाणें वागेन.

**बजर०**–ठीक आहे. हे घ्या माझे कपडे ( कपडे देतो. ) हे अंगांत घाला आणि ते शिपाई इथून जाईपर्यंत त्या झाडामागें गप्प उभे रहा. शिपाई गेल्यावर रस्ता फुटेल तिकडे जा. तुम्हाला कुणी आडवणार नाहीं.

**प्रवासी**–( कपडे घालून ) तुम्ही सांगितल्याप्रमाणें अगदीं तशीच वागणूक ठेवतों.

**बजर०**–माझ्या सांगण्याप्रमाणें करायला जरा विसरलांत कीं घसरलांतच म्हणून समजा. जा–आतां त्या झाडामागें लपून उभे रहा पाहूं. ते पहा शिपाई आले. मीही ह्या रस्त्यानं आतां मानवी दृष्टीआड होतों. (प्रवासी गेल्यावर) परकायाप्रवेशाचं शास्त्र ह्याच–कपडे बदलण्यापैकीं नाहीं असं कोणचा शास्त्रज्ञ म्हणेल! मृत्युलोकचं काम संपल्याबरोबर पोषाखानं जर

परकायाच्छादन केलं–तर ह्या पात्राचा ह्या रंगभूमीवरचा अखेरचा प्रवेश झाल्याबरोबर–पुन्हां जरूर लागेपर्यंत ब्रह्यामध्यें मिसळून राहण्याकरतां ह्या देहानंही हें असं स्वर्गारोहण कां करूं नये? ( आकाशांत नाहींसा होतो. )

**प्रवासी**–अरे पण हें काय? हा प्राणी वर कुठें गेला? अँ! अगदींच आतां दिसेनासा झाला.

( दोन मुसलमान शिपाई येतात. )

**प० शि०**–क्या करना बडेभाई, वोह् बिठुमहारका पता बिल्कुल् लगता नही. यह् जंगल्मे वोह् पैलीवर पानीका झरा है उधर क्या नजर आता है?

**दु० शि०**–अरे वोह् तो सुव्वर पानी पीरहा है!

**प० शि०**–अरे नही! वोह् बिठुमहारही भाकर खानेको बैठा है ऐसा प्रख आता है!

**दु० शि०**–प्रख आता है तो जा–देख्के आव! हम् जरा नास्ता बनाता है! ( पहिला शिपाई जातो व दुसरा खायला बसतो. )

**प्रवासी**–( झाडाच्या आडून स्वगत ) तो वनचर म्हणावा तर एखाद्या जादूगारासारखा वर आकाशांत उडून नाहींसा झाला. बरं देव म्हणावा तर त्याला अशा रानांत ह्या असल्या पोशाखांत यायचं कारण काय? बरं मला साह्य करायला देव आला म्हणावं तर मी तर पुरा नास्तिक. तेव्हां तो ईश्वर तर खास नव्हेच. मग हें काय गौडबंगाल असावं! बरं तें कांहीं कां असेना! पण एकंदर कृत्यांत जी एक मोठी चूक झाली आहे तिची दुरुस्ति आतां कशी करावी? ह्या पोषाखाची जशी बदली झाली तशी त्याचं नांव विचारून घेऊन तीही करून घेण्याचं विसरलों. पण जाऊंदे. आपलं अपरिचित रंगराव हें तर नांव आहेच किं नाहीं? ( पहिला शिपाई येतो. )

प० शि०—अबे ए जुअल्बकर् , हुवा के नही तेरा खाना ? अबे एक् सिकार् नजर् आती है !

दु० शि०—( खातांखातां ) जानेदो. अभी मुजे बिल्कुल् इस्तिहा नहीं.

प० शि०—अरे तूं क्या पागल् अझी है ? सिकार क्या खानेकीहि रह्यती है ? अरे उस् दीन् वोह् नद्दीमे जो इन्सान् गाहिब हुवा वोहि सिकार इस् जंगलमे मिल्गयी है !

दु० शि०—( खात खात ) अरे जानेदो जहानंमे ! कुछ पर्वा नही !

प० शि०—अरे पादशाहाके तरफसे बडा इनाम् मिलेगा !

दु० शि०—( खात खात ) किस्को ?

प० शि०—तुम्को !

दु० शि०—काह्यके लिये ?

प० शि०—वोह् गाहिब हुएले इन्सान्को पकड्नेसे.

दु० शि०—(खात खात) अच्छा-तो-जाव-उस्को पकडलेआव !

प० शि०—और तुम् क्या करेगा ?

दु० शि०—( खात खात ) उस्को पादशाहाके साम्ने लेजाएगा और इनाम मिलाएगा.

प० शि०—शकल् तो खूब निकाली तूने ! बचा किस्का और बाबा किस्कु कह्यता है ! ठीक. ( पाहून ) अरे भूका मूवा—ऊठ—वोह् देखो खास हुजेंनगीषे आलिम् पादशाहाकी सवारी इस् रास्तेसेही आती है. मै आगे बढकर वोह् इन्सान्को पकडता है ! ( पुढें जाऊन झाडाच्या मागें लपलेल्या प्रवाशाला पुढें आणतो; )

दु० शि०—( खातां खातां ) क्यौंबे, गहीब होता है नद्दीमे नही ? चलो अभी ! हमारा खाना होचुका. अभी तुम्को हामारा इलाहि तोबा बताता हूं !

**प्रवासी**–अरे, कोण नदींत नाहींसा झाला होता? मी होय? अरे मी तर आतांच ह्या रानांत दक्षिणेकडून आलों. हातचा चोर पळून गेल्यावर फजीती होऊं नये म्हणून दुसऱ्याच एखाद्या गरीबाला पकडून बक्षीस मिळवणाऱ्या शिपायांपैकींच तुम्ही दिसतां?

दु० शि०–जियादी बात् मत् कर्! लंबा करदेगा. यहि कपडे उस् दिन् तुमारे बदन्मे थे. तुम्हाराही नाम बजरबट्टू है!

**प्रवासी**–अहो माझं नांव रंगराव आहे!

प० शि०–हां आया ध्यानमे! तुम् वैसाही रंगदार अझी है. खडा रहेजा. इधरसे एक उंगुलभी हिलना नही. ( बादशहा येतो. )

**बादशहा**--

दोहोरा

**बुजर्गा बुजर्गी देहे बे कसम् ॥ तुंई आवरी बक्ष यारी रसन्॥ नियावर्द मष्वान चीजेन खुस्त ॥ तुंदादी हमा चीज् मंचीज् तुस्त ॥ १ ॥**

अय् कुल् हक्तुआला, तमाम् कादिर मुताल्, तू बडा रहेम्वाला होके मुज्को काह्यको मुलाझमत् देता नहीं? इत्नी छोटी थैली साथ लेके दामाजीके वास्ते रसद भरनेकी तख्लीफ् लिया और मेरे कलेजेको ठंडा करनेकेलिये काह्यको नही आता? एक् पाक् और दस् लाख् नापाक्. एक तसबीर् और दस् लाख् तद्बीर. ऐसी तो बात् नही है. मै बडा गुन्हेगार तो बेषख् हूं. लेकिन् तेरा तख्सीर्–मुशीर् यह् नाम् कैसा बेबक् होगा?

( दोघे मुसलमान शिपाई प्रवाशाला पुढें करतात. )

दु० शि०–नदीमे गहीब हुएला अझी मैंने पकडकर लाया है!

प० शि०–पहिले हम्ने उस्को गिरफ्दार् किया!

**बादशहा**–ऐरे पस्त हिंमतो, काहेल्वजूदो! ऐसे मौकेपर उस्के बदला तुमारे सरीखे बेवकुफ् और कम्जाद् अझीकोहि पहिले सूली चढाना मुम्कीन है. कौमका नमाज पढनेमे मष्गूल हुएले इन्शाहुतालाके इन्सानको–रास्तेमे ऐसी बेवफा धूम मचाके हमारे सरीखे सल्तनत् पादशाहाको बेजार करने चाहता है! चले जाव यहांसे! यह सब् अझी साथ लेके आगे बढो! ( बादशाहाशिवाय सर्व जातात. ) अय खुदा, तुज्को यह् बंदा, धूंडता है करके आदा, लेकिन् रोष करके जियादा, नजीक्से काह्यको होताहै बिदा? अल्लाकी बंदगी उठाता है जो हाथ, उस्के उप्पर काह्यको देना लाथ? इन्सान्के बदन्संदूकमे जो रह्यती है जान्, उस्को रख्नेवालेका जो नही ठिकान्, तो शुकरगुझारका कौन्सा मानना मकान्? अय् खुदा, मै लाचार हूं!

गजल.

मेरे महेबूब् तेरी याद है हरबार मुझे ॥
रहेमकर् जल्वा दिखादे मेरे दिल्दार् मुझे ॥ मेरे महे० ॥
बर्कंकी तरह् चमक् हुस्नकी दिख्लाके सनम् ॥
कर्लिया अग्नि मुहब्बत्का है बीमार मुझे ॥ ध्रु० ॥
दिलो ज्यां दोनो लिये बेहेरे नजर हाजीर हूं ॥
अप्ना दर्बार् दिखादीजिये सर्कार् मुझे ॥ मेरे महे० ॥
जब्के हर कौनो मकांमे है तु हाजिर् नाजिर् ॥
फिर् नजर् क्यौं नही आता तेरा दीदार मुझे ॥ मेरे महे० ॥

( बादशाहा जातो. )

---

## प्रवेश तिसरा.

[ पंढरपूरचें विठ्ठलमंदिर–दामाजी स्नानकरून पुजासाहित्यासह येतो. ]

**दामाजी—**

( पावना वामना० )

**श्रीधरा श्रीवरा श्रीकरा हें मन रंगलें तवार्चनिं स्वीकरा ॥ ध्रु० ॥**
**राधोष्ठमधुपकुंजविहारिन् ॥ भक्तहृदांतरकंधरा ॥ हें मन० ॥**
**हे सत्सारपदा चिद्रूपा ॥ वेदमतांकितमंदिरा ॥ हें मन० ॥**
**भवसरिदाश्रितनौकाधारा ॥ सौमित्राग्रजसुंदरा ॥ हें मन० ॥**

—पांडुरंगा, तुझ्या मंडलांतल्या पारमार्थिक स्वरूपाचा अक्षय जप करणाऱ्याला तूं वैकुंठास नेतोस असं म्हणतात; पण मी म्हणतों कीं, तूं आपल्या मंडलांत वास करीत असूनही आम्हां मानवांच्या देहांत जर आहेस तर तुला सोडून जाण्याची इच्छा कोण करील? वेदांसारख्या श्रेष्ठ ग्रंथांनीं तुलाच परमात्मा म्हटलं आहे. इतिहास, पुराणं तर तुला अंतरात्मा म्हणतात. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति–ह्या तिन्ही अवस्थांचा तूंच बाह्यात्मा आहेस. तेव्हां अशा ह्या आत्म्याचं वर्णन करतांना वेदवेत्ते जर थकले तर मी काय करणार? पर्जन्याशिवाय सूर्याच्या तेजांत जशी प्रखरता येत नाहीं, तद्वतच मूढजनांच्या हृदयांत संकटांशिवाय तुझ्या अस्थित्वाचा प्रकाश पडत नाहीं. विठ्ठला, आज मी ही तुझी शेवटची पूजा करायला इथें आलों आहें, ह्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटतं. राजद्रोहाबद्दल बादशाहानं माझा जीव घेतल्यावर तुझी पूजा करायला माझ्या गोत्रांत कोण आहे? संतान होईपर्यंत नवरा जसा बायकोचा ऋणी असतो त्याचप्रमाणें मी संततिरहित असल्यामुळें तूं माझा ऋणी आहेस. देवा, ह्या ऋणाचं ओझं आतां ह्या जन्मांत कसं फिटणार? माझ्या पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें —

( कांते फार तुला० )

होतें दुःख अती मजला तें जल नयनीं येतें ॥ तर्पित जल मग माझ्या मागें पितरां द्याया कुणी नच उरतें ॥ ध्रु० ॥
स्वीकृत पायस अंजुली भरुनी पितर तयावारि सोडिति श्वासा ॥ कोमट जल तें दुःखाश्रूनीं तप्त होउनी दे त्रासातें॥१॥

ज्याला आपण पाणी घालून वाढवलं तें झाड जर वांझ निघालं तर आपल्याला जसं दुःख होतं तसं माझ्याबद्दल ब्रह्मदेवाला कां होऊं नये ? विठ्ठला,——

अभंग

( देस-दादरा )

दान तप देई ॥ पुण्य मनुजातें ॥ सुख परी त्याचें ॥ परलोकीं ॥१॥
धरिं तैं परत्र ॥ करि शुद्ध पुत्र ॥ कल्याण सर्वत्र ॥ सारखेंची॥२॥

अशी स्थिति असून—शिवाय, ऋणबद्ध आणि त्यामुळें अपवित्र अशा देहाचं जें आतां बेदर मुक्कामीं मला मरण येणार तें पवित्रपणांत आलं असतं तर बरं झालं असतं. ( पाहून ) असो— ह्या प्रसंगीं माझी धर्मपत्नीही इथें येऊन पोंचली हें एक प्रकारें चांगलंच झालं. तिच्याबरोबर तें मुजूमदारांचं कुटुंब आज पांडुरंगाच्या द्वारीं आलं, हेंही स्वतः पश्चात्ताप पवित्र झाल्यासारखंच झालं. आतां ह्यांना आज अखेरचं गीताश्रवण करवून राजाज्ञेला नम्र व्हावं. ( विठोबाची पूजा करण्याकरतां पुढें जातो व सावित्री आणि पार्वती बाजूनें येतात. )

**सावित्री**—पार्वतीबाई, अहो वैकुंठ, कैलास म्हणून जें कांहीं म्हणतात किं नाहीं तें सगळं ह्या पंढरीक्षेत्राच्या छाया आहेत. इथें जें प्रत्यक्ष मिळतं तें तिथें कसं मिळणार ? अहो, आपलं तर मुख्य व्रत काय कीं, आपल्या पातिव्रत्याचं रक्षण करून, परमेश्वराच्या सेवेनं त्याचं उतराई व्हायचं. तेव्हां तुम्हीच सांगा कीं, वैकुंठाला किंवा कैलासाला ह्या देहाला जीव सोडून गेल्यावर

इथल्यासारखी तिथे आपल्याला देवाची सेवा करतां येईल का? मोक्ष पाहिजे–मोक्ष पाहिजे–असं नुसतं तोंडानं बोलून का मोक्ष मिळतो? मोक्ष म्हणजे कांहीं एक मोठी अप्रूप जिन्नस नाहीं कीं, जी आपल्यापुढें धांवत येईल. चला–आपलीं अंगधुणीं झालींच आहेत. देवाच्या पाया पडूं.

( विठोबाच्या व दामाजीच्या पाया पडतात. )

**दामाजी**–तुम्हां दोघींचं कल्याण होवो!

**पार्वती**–खऱ्या भगवत्भक्ताचे शब्द खोटे कसे होतील!

**सावित्री**–इतक्याकरतांच पांडुरंगानं आजपर्यंत किती तरी रूपं प्रगट केलीं आहेत.

**दामाजी**–( बसून ) बसा! नरश्रेष्ठ अर्जुनाला भगवंतांनीं गीतेच्या नवव्या अध्यायांत काय सांगितलं आहे तें ऐका! ( दोघी बसतात गीता सुरू होते व श्रोतृवर्ग देवळांत जमतो. ) सर्व चराचराला व्यापून उरलेला परमात्मा काय म्हणतो ऐका—

**श्लोक**

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ॥**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ ३ ॥**

जे जन अनन्यभावानं माझं चिंतन करतात, सर्वदा चित्त स्थिर करून मला भजतात त्यांना नसलेलं मिळेल कसं आणि असलेलं मिळायला राहील कसं याची चिंता मी वाहतों. ( पान उलटतांना पावती सांपडते ती वाचून आश्चर्यानं ) हा काय प्रकार हा? दुष्काळग्रस्तांकडून जीं धान्याचीं कोठारं मीं लुटवलीं त्याचे दाम बेदरच्या बादशाहाकडे भरल्याची ही रसद ह्या पोथींत कुठून आली?

**सावित्री**–आतां श्लोक वाचला त्यांतलं देवाचं म्हणणं देवाला खरं करून दाखवायला एखादा दाखला हवा होता. आतां हा प्रत्यक्ष प्रमाणाचा दाखला बघितल्यावर ते शब्द खरे होतीलका असा संशय घेण्याची काळजीच राह्यली नाहीं.

**दामाजी**–पांडुरंगा, हें कृत्य जर तूंच केलं असशील तर खरोखर—

( जायतिजय सुरसरित्० )

करणि तव रुचिर ती सुचिर अति जाहली ।। ध्रु० ।।
भक्त करिं धरुनि तूं तारणा तत्प्रती ॥ करिशि,
विघ्नांशि तूं भक्षणाशीं बली ॥ १ ॥

असं जरी आहे तरी आतां आम्हाला राजाज्ञेप्रमाणें बेदराला जायला निघालंच पाहिजे.

( मुजूमदार एकदम येऊन दामाजीचे पाय धरतो. )

**मुजूमदार**–

( चिन्मया सकलहृदया० )

तारणा सुकारि शरणा ।। मतिला पडला भ्रम उडला मद सरला दीनोद्धरणा ॥ ध्रु० ॥ विठ्ठलचरणाश्रितभरणा ।। तव पाया मम काया अर्पुनियां ॥ हा नत झाला अभयाला द्या याला बलपूर्णा ॥ ध्रु० ॥

**दामाजी**–उठा, मुजूमदार, तुमचं रक्षण पांडुरंगच करील. तुम्हां आम्हां–दोघांवरही सारखाच आरोप आहे.

**मुजूमदार**–( उठून ) आपणावरचा आरोप उडाला. आतां माझ्या अपराधाचा न्याय करणं बादशाहानं आपल्यावर सोंपवलं आहे. तेव्हां आतां मी अपराधी सर्वस्वी आपल्या हातीं आहें.

**पार्वती**–शरणांगताचं रक्षण करणं हेंच थोरांचं खरं ब्रीद आहे.

**दामाजी**–असंच जर असेल तर तें पांडुरंगच करील.

( आवडा येते. )

**आवडा**–( दामाजीचे पाय धरून) मला ह्या मुजूमदारांनीं–बजरबट्टूच्या संगतीनं फसवली. म्हणून मी बादशाहाकडे गेलें. त्याला मोहित करून आपलासा केला. पण अखेरीस तेंही

हत्यार हातचं गेलं. वाऱ्यानं हालणाऱ्या वृक्षपल्लवीच्या छाये-प्रमाणें राजेलोकांच्या इच्छा असतात अशी खात्री झाली. आप-ली रसद भरायला जो विठुमहार आला होता त्याच्या बरोबरच्या पत्रांत माझ्या खाजगी हकीकतीचं वर्णन होतं. तें बादशाहाच्या मनाला डसलं. त्यानं माझा न्याय करणं आतां आपल्याकडे ठेवलं आहे. तेव्हां--

( मी असोनि नृपकांता० )

पाहि ही अशी अबला ॥ न सबला ह्या काला ॥ ध्रु० ॥
झुंजवी कुगर्व खलां ॥ असाधु अतिच असला ॥ चाल ॥
हा अनुताप मज होय ॥ जळूनि जाय काय ॥ करूं मि
बाइ काय ॥ चाल ॥ कृपा करा ॥ मम सुखावरा ॥
**दामाजी**–पंक तुझ्या मतिचा ॥ झडला तो साचा ॥ चाल॥
भक्तिपथ आतां धरी ॥ तरीच गत बरि ॥
तरूनि जाय तरि ॥ तुझाग जिव वरि ॥ चाल ॥
सुखी रहा ॥ प्रभुपदां पहा ॥
**आवडा**–बोध मनीं ठसला ॥ प्रभुपद धरि अबला ॥
**दामाजी**–सुख तुज आपोआप ॥ देइलग अनुताप ॥
**आवडा**–पाहि ही अशी अबला ॥ ध्रु० ॥

( बजरबट्टूचा वेष घातलेला **रंगराव** येतो. )

**रंगराव**–महाराज् मला रानांत एका माणसानं हा वेष दिला. मी मुजूमदारांचा खरा मावसभाऊ आहें. मुजूमदारांच्या सर्व नातेवाईकांना कैदी करण्याचा बादशाहाचा हुकूम सुटला असल्यामुळें मला त्रास न व्हावा म्हणून त्या विचित्र माणसानं आपला हा पेहेराव मला दिला आणि तो एकदम् भुतासारखा वर उडून आकाशांत नाहींसा झाला. तोच माणूस ह्या मुजूम-दारांचा खजानजी होता असं त्यानं मला सांगितलं. तेव्हां आतां ह्या एकंदर कृत्यांत माझा अपराध काय आहे तो सांगा. मी शरण आहें.

**दामाजी**–अपराधी असो अथवा निरपराधी असो–ह्या विठ्ठल-मंदिरांत जो कोणी येऊन श्रीहरिचरणीं लीन होईल तो सर्व संकटांतून पार पडेल. म्हणून श्रीविठ्ठलालाच तुम्हीं शरण जा.

( विठ्ठलाच्या पाया पडायला जातो. )

**मुजूमदार**–काय चमत्कार आहे! तो बजरबट्टू कोण आणि हा कोण? आजपर्यंत तो माझ्या घरीं असतां मी त्याला ओळखला कसा नाहीं? त्यानं मला फें म्हणायचं वेडाचं सोंग घ्यायला लावून अखेर त्यानं सर्वांनांच फें दाखवला!

**दामाजी**–मुजूमदार, ही सर्व परमेश्वरलीला आहे. तो माझा विठ्ठलच खास तुमच्या घरीं त्या वेषानं राह्यला होता. हे तुमचे मावसबंधु सांगतात कीं, तो आकाशांत नाहींसा झाला. ह्यावरून तुमची खात्री होत नाहीं काय?

**मुजूमदार**–खरोखरच मी अभागी!

**दामाजी**–अहो, तुम्ही एकटेच कसे? आपण सर्वच अभागी! पण ह्यांत कांहीं मोठं विलक्षण नाहीं. आपण प्रत्यक्ष असा परीस कधींच जर बघितला नाहीं तर ओळख न पटणं हें मानवी बुद्धीचं साहजिक लक्षण आहे.

**मुजूमदार**०–जो विठुमहार बादशाहाकडे आला होता तो तोच होता असं मला त्यावेळीं वाटलं; पण त्यावेळीं मीं वेड पांघरलं होतं. शिवाय तो रसद भरून गेल्यावर कुठे एकदम नाहींसा झाला तो बादशाहाच्या स्वारांना सुद्धां सांपडला नाहीं.

**दामाजी**–आलं आतां लक्षांत. त्याच सर्वेश्वरानं ही पावती माझ्या पोथींत गुप्तपणानं आणून ठेवली यांत संशय नाहीं.

**आवडा**–मलाही त्या विठुमहाराचा संशय आला होता. माझ्यावर बादशाहा रागावण्याचं कारण तोच. त्याच विठु महाराला भेटण्यासंबंधानं बादशाहा अगदीं वेडा झाला आहे.

**दामाजी**–हा सर्व प्रकार ऐकून—

( निजमख रक्षाया० )

लोचनिं जल येतें ॥ मानस रमतें ॥ विठ्ठलकुतुकीं तें ॥ ध्रु० ॥
इतुके दिन जो दीनजनांचा ॥ त्राता होता जवळी साचा ॥ चाल ॥ नच कुणि उमगियला ॥ मोहावला ॥ जन तन्मायेला ॥ चाल ॥ दर्शन ऐसें अनुपस्थित तें ॥ देउनि होशी गुप्त वदे तें ॥ ध्रु० ॥

( बादशाहा येतो. )

**बादशाहा**–( दामाजीनें उठन सलाम केल्यावर ) दामाजी, तुम् जातका अस्सल् बम्मन् है! तेरी विठल्की पुरुश्ती नेहायत उम्दी है! हमारा तुम् गुन्हेगार हुवाथा, लेकिन् आश्रफि तूने भरपाई किया उस् सबब्से गुन्हेसे तुम् अलग् हुवा है. यह मुजूमदार और उस्की प्यारी वोह् नायकन् दोन्हीं हमारे गुन्हेगार है. उस्का गुन्हा तुम्को जाहेर है! इस बारेमे तुम मुन्सीफ होके उस्को एकदम सजा जाहेर करो.

**दामाजी**–हुजूर ह्या दोघांना पूर्ण पश्चात्ताप होऊन ह्यांनीं इतउत्तर आपलं आयुष्य ईशभजनांत घालवण्याचं योजलं आहे. तेव्हां ह्यांच्या ह्या स्थितींत ह्यांना क्षमेपेक्षां अधिक कडक शिक्षा मी काय सांगणार? अरे कुणीतरी त्या दत्तमंदिरांत धरणं धरून बसलेल्या ब्राह्मणाला घेऊन या. ( एक शिपाई येतो. )

**बादशाह**–आच्छा–तेरी दानिष्मंदी हमे जाहेर है. इस् लिये तुमारा इन्साफ् हमे कुबूल है. अभि वोह् तुमारा बिठु-महार कहां है वोह् हम्को बताव. उन्के पास बहोत छोटी थैली थी और् उनोने उस्मेसेही सब दाम देदिया. उनोने हमारा दिल् गिरफ्दार किया है. बिठुको मुजे बताव.

**दामाजी**–हा चमत्कार मला कांहींच माहीत नाहीं. आपल्या शिक्याची पावती मात्र माझ्या पोथींत सांपडली. ती ही पहा.

ह्या सारा ईश्वरी चमत्कार झाला असंच म्हटलं पाहिजे. आतां-पर्यंत मी त्या विठूमहाराला कधींच पाह्यला नाहीं.

**बादशाहा**–ऐसा कैसा होगा? उन्होनें तुमारा नाम लिया. वोह् तुमारा नोकर था ऐसा साफ् बोलचुका. ऐसा होके ऐसी बात् तुम्ने कह्यना लाजीम नहीं. एकदम् उस्को मेरे रूबरू लेआव.

**दामाजी**–त्याला दर्शन दे म्हणून आज्ञा करायला तो माझा नोकर का आहे? विठ्ठला, काय ही तुझी अगम्यलीला? मुजू-मदारांच्या घरीं राह्यलास तो वेष निराळा. बेदरास गेलास तोहि निराळा. असं इतकं करून मला प्रत्यक्ष चतुर्भुज रूपांत अद्याप कां दर्शन देत नाहींस? हुजूर, आमच्या शास्त्रांत भगवंतांनीं असं सांगितलं आहे कीं, 'कोणचाही पंथ असो, कोणचीही इच्छा असो किंवा कोणचाही प्रकार असो–जो ज्या तऱ्हेनं माझी भक्ति करतो त्या तऱ्हेनंच मी त्याला पावून तो माझ्यांत येऊन मिळतो.' तेव्हां आपल्याला परमेश्वराचं स्वरूप विठुमहाराच्या वेषांत बघण्याची इच्छा जर आहे तर डोळे मिटा आणि तें स्वरूप लक्षांत आणा म्हणजे साक्ष पटेल! ( बादशाहा तसें करतो. )

## अभंग.

**माझ्यासाठीं कांरे महारवेषास ॥ धरुनि गेलास बेदरास ॥ १ ॥**
**दास मी तुझारे असोनि माझाच ॥ झालासी सायास करोनीयां ॥ २ ॥**
**संकट टाळाया मज दीनासाठीं ॥ धांवलासि जैसा जगजेठी ॥ ३ ॥**
**धांव तैसा आतां बादशाहालागीं ॥ दर्शन तयासीं द्यावें वेगें ॥ ४ ॥**
**तुज जे भजती ज्या ज्या प्रकारांनीं ॥ त्या त्या प्रकारें त्या फळ देसी ॥ ५ ॥**
**चतुर्थ अध्यायीं वदलासि पार्था ॥ सार्थ करी आतां वाणी तीरे ॥ ६ ॥**

[ रंगभूमीवर विठुमहाराचं दर्शन देण्याचा देखावा करणें असेल तर तो देखावा या अभंगाच्या शेवटीं करावा. ]

**बादशाहा**–( डोळे उघडून ) अहाहा! मेरा कलेजा ठंडा हुवा. दामाजी, क्या तेरी तौर है के तेरेवास्ते खुद्बखुद् अल्ला तेरी खिद्मत् उठाता है! तेरी मिजाज् बहोत् खूषी फर्माती है! आज़्से तुम् हम् बिरादर् होचुके?

**दामाजी**–राजा आणि प्रजा ह्यांचं नातं बापलेंकरांचं असतं; पण तें पाळलं जात नाहीं त्याला इलाज नाहीं. जें जसं घडायचं तसं घडलंच पाहिजे. माझ्या नशीबाचं चरित्र असं होईल असं कधींच कळलं नव्हतं; परंतु विठ्ठलानं–

### साकी

स्वल्प अतीतर काळामध्यें दोन स्वरुपीं केला ॥
संभव अपुला, शब्द सत्य तो गीतेंतिल कीं झाला ॥
दीनां रक्षाया ॥ धांवे ऐसा प्रभुराया ॥ १ १ ॥

**ब्राह्मण**–( येऊन ) आज सर्वत्र आनंदी आनंद झाला. ज्यानं आजचा हा आनंदाचा दिवस दाखवला अशा ह्या अनंतलीलाधर प्रभूचं भजन आपणां सर्वांनीं मिळून एकवार करून आतां त्याचं उतरायी कां न व्हावं?

( भजनीमेळा जमून सर्व भजन करतात. )

### पद

भक्त रंगे विठ्ठलसंगें पाद वंदोनी ॥ हरीचे पाद वंदोनी ॥
ब्रह्मानंदीं विठ्ठलफंदीं गुंगा रंगोनी ॥ सुखें हो गुंगा रंगोनी॥१॥
देवतार्चन करुं तें नर्तन नाम गर्जोनी ॥ प्रभूचें नाम गर्जोनी ॥ आत्मानंदीं संस्कृतछंदीं रंगूं डोलोनी ॥ आम्हीं हो रंगूं डोलोनी ॥२॥ संतपिंगा चढवी रंगा नाम बोलोनी ॥ विठूचें नाम बोलोनी ॥ चित्पदगंगानाम अनंगा हरी वेगांनीं ॥ अनंगा हरी वेगांनीं ॥ ३ ॥

**समाप्त.**

ॐ

# पुस्तककर्त्याची प्रार्थना

( सुंदरमुख तुंदिल० )

विठ्ठलपदचिंतनसुखमार्ग हा बरा ॥
महिवर इतर न ह्यासम मोक्ष दूसरा ॥ ध्रु० ॥
देवकिसुतसोमवंशवीरमुरहरा ॥
चरणच्युतमंदाकिनिपुत्रप्रियकरा ॥
पांडवमतमानकरा सूतशेखरा ॥
सेवा । सेवा । दावा । पदकमला भवगरला-
न्वितमतिला । इंदिरावरा ॥ ध्रु० ॥
ॐकृतश्रुतिसत्वतत्वधारका नरा ॥
दास्यमान आर्यधराधर्म सावरा ॥
शरणागतआर्यजनांसाठिं अवतरा ॥
गीता । माता । माथां । धरुनि, जनीं । तद्वचनीं ।
विश्वसुनीं । राहिलों घरा ॥ २ ॥
स्वनृपदुर्भिक्ष्य छळी धुरिणनरमतां ॥
द्वैतानल पोळितसे देशिंच्या हिता ॥
दुःखाश्रित सौमित्रा पावगा अतां ॥
यावे । घ्यावे । सेवे । मदियकरीं । अरिनिकरीं ।
अवनिवरीं । वसत श्रीधरा ॥ ३ ॥

